


# नाडी ग्रंथ भविष्य


परम शिव


शुक्र


सूर्य


चंद्र


गणेश


गुरू




बुध


मंगळ


शनि


राहू


केतू

लेखक : विंग कमांडर शशिकांत ओक


डावा (स्त्री)




नितीन प्रकाशन, पुणे-२


उजवा (पुरुष)

Rs 50/00



## चला नवग्रह मंदिर यात्रेला !

# नाडी ग्रंथ भविष्य

किंमत ५०/- फक्त

हे परमशिव–माता पार्वती,
ज्याचे वंदन करून श्री अगत्स्य, शुक, भृगू, काक भृशुंडी, वशिष्ठ,
पराशर आणि इतर अज्ञात महर्षी
नाडी ग्रंथ निर्मिती करतात त्यांना त्रिवार नमन.
त्यांच्या चरणी प्रस्तुत लेख – सुमने अपर्ण –

लेखक : विंग कमांडर शशिकांत ओक

नविन सुधारित आवृत्ती जानेवारी २००८



नितीन प्रकाशन – पुणे. ४११००२

## अनुक्रमणिका



# भूमिका

या पुस्तकाची प्रथम आवृत्ती फेब्रुवारी २००३ साली प्रकाशित झाली. गेल्या चार वर्षात ही चौथी आवृत्ती निघत आहे.

नाडी ज्योतिष अधिवेशन पुण्यात दिनांक १४ ऑक्टोबर रोजी भरविण्यात आले होते त्याचा वृत्तांत व त्यामधील विचारांवर आधारित लेख या आवृत्तीत समाविष्ट करण्यात आले आहे. शांतिदीक्षा करण्यासाठी नवग्रहांच्या यात्रेचा प्रसंग येतो. त्यांच्या सोईसाठी सविस्तर माहिती प्रथमच देत आहे.

पुनर्जन्माबाबत अद्याप बरेच शिक्षण आहे, पण नाडी ग्रंथ भविष्यच शेवटी निर्णायक पुरावा म्हणून पुढे येतात हे पुनर्जन्मातील व्यक्तीरेखा शोधण्यात यशस्वी झालेल्या डॉ. दिलीप नाहरांची शोधयात्रा वाचून वाचकांना थक्क करेल.

प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांच्या विज्ञान आणि चमत्कार या जागतिक दर्जाच्या पुस्तकातील नाडी ग्रंथ हे आकाशिक लेखनाचे निर्णायक पुरावे असल्याचे विश्लेषण वाचकांना त्यांच्या उत्तुंग ज्ञान प्रतिभेचा परिचय करून देईल.

एकंदरीत हे पुस्तक प्रथम वाचकाला विस्मयाची अनुभूती देईल तर जुन्या वाचकांना नविन माहिती वाचल्याचा आनंद देईल. या आवृत्तीत अनेक बदल केलेले आहेत. अनेक नव्या केंद्रांचे, काही बदललेल्या जागांच्या केंद्रांचे पत्ते समाविष्ट केले आहेत. प्रकाशक श्री. नितीन गोगटे आणि मुद्रक श्री. संजय देशपांडे यांना धन्यवाद कारण त्यांच्या कष्टांमुळे ही आवृत्ती साकार होत आहे.


एक नाडी ग्रंथ प्रेमी

विंग कमांडर (नि.) शशिकांत ओक

पत्ता – ए ४/४०४ गंगा हॅमलेट सोसायटी विमान नगर, पुणे. ४११०१४.

मोबाईल – 09881901049



: प्रकाशक :

नितीन गोगटे,
नितीन प्रकाशन,
१४७ बुधवार पेठ, आप्पा बळवंत चौक,
जोगेश्वरी मंदिर लेन पुणे-४११ ००२
Tel. 24 48 35 16/17

: नवीन चौथी आवृत्ती :

दिनांक १ जानेवारी २००८

★





: अक्षर जुळणी व मुद्रक :

संजय देशपांडे,
ॐकार प्रोसेस,
ए-२३, तुळशीबागवाले कॉलनी,
सहकारनगर नं. २, पुणे-९.
फोन : २४ २२ ११ ३३

प्रकरण १

# श्री अगस्त्य नाडीचा प्रथमानुभव

आजच्या विज्ञानाच्या जगात जर कोणी तुमच्या फक्त अंगठ्याच्या ठशावरून तुमचे नाव, तुमच्या आई-वडिलांचे, पती/पत्नीचे नाव, जन्म, वर्ष, महिना नव्हे तिथी, तुमचे सध्याचे चालू वय सांगण्यात यशस्वी झाला तर तुम्ही त्या नाडी ग्रंथभविष्यकथनाला काय म्हणणार? जादूगाराची हातचलाखी किंवा तर्काच्या पलीकडे ज्ञात न होणाऱ्या शक्तीचे एक साधे व सहज प्रदर्शन ?

नाही ही जादूगाराच्या पोतड्यातील आकर्षक जादू नाही किंवा अंधश्रद्धा निर्मूलनवाल्यांनी कचाट्यात धरलेल्या साधू-बैराग्यांच्या नादी लागलेल्या भगत गणांना भुलवण्यासाठीची चालही नाही. मग हे आहे तरी काय ?

मतीला गुंग करणारे व सर्व तर्क फोल ठरवणारे हे भविष्यकथन नाडी ग्रंथांवर आधारित आहे. प्राचीन काळी विविध ऋषींनी वेगवेगळ्या ठिकाणी आपल्या प्रज्ञाचक्षूंनी पाहिलेले व त्यांच्या शिष्योत्तमांनी अति काटे-कोरपणे लिहून घेतलेले हे भविष्य हजारो वर्षांनी नेमक्या व्यक्तीच्या हाती देण्याचे महान काम पाहिल्यावर मानवी विज्ञानाच्या आजच्या कक्षा अजून किती तोकड्या आहेत, हे प्रत्ययाला येते.

प्राचीन काळापासून अशा काही महामानवांनी करुणावश भावी काळातील मानवांच्या जीवनपटांचे भविष्य शोधून, नोंदून ठेवले. त्या मागील त्यांचा उद्देश मानवाने जीवनाकडे सकारात्मक दृष्टीने पाहावयास प्रवृत्त व्हावे असा होता. त्या सर्व नोंदींच्या ग्रंथसंपदांना नाडी ग्रंथ भविष्य असे म्हणता येईल. भविष्य-काळात मानवाच्या जीवन सरितेत निर्माण होणाऱ्या बऱ्या-वाईट प्रसंगांना तोंड देण्यासाठी मनोधारणा तयार करता यावी, दुर्दैवाने काळात हताश मनाला उभारी देऊन निष्क्रिय बनू नकोस असा संदेश देण्याचा नाडी ग्रंथांचा उद्देश आहे.

भारतात प्राचीन ज्ञान जपणुकीची, वर्धनाची व्यवस्था पूर्वापार असल्याने त्या मानवांची-एका अर्थाने महामानवांची-महर्षींची ग्रंथसंपदा हजारो वर्षांच्या कालखंडात टिकवून ठेवली गेली आहे. त्यामुळे आजही त्या ग्रंथसंपदेचे अवलोकन करणे माणसाला शक्य झाले आहे. ज्या महर्षींच्या हातून हे कार्य घडले त्याला त्यांनी अंत:प्रेरणा, स्फूर्ती असे म्हटले. काहींना ईश्वरी आदेश मिळाल्याची भावना झाली. अशाच अंत:प्रेरणेचा, साक्षात्काराचा आविष्कार म्हणजे नाडी ग्रंथ होत !

अगस्त्य, महाशिव, वशिष्ठ, आदी नाडी केंद्रांना भेटी देऊन त्या महर्षींनी लिहिलेले भविष्य अवलोकन करण्याचे भाग्य मला लाभले. ते अनुभव आपल्या पुढे मांडून या भविष्याबाबतची सखोल माहिती वाचकांपुढे ठेवावी व कदाचित भविष्य पहाण्यास त्यांनी उद्युक्त करावे अशी दैवी योजना असावी म्हणून हे पुस्तक लिहिण्याचा व प्रकाशित होण्याचा योग असावा.

तमिळनाडू राज्यातील चेन्नई (मद्रास) जवळ एअर फोर्स स्टेशन तांबरम येथे १९९३ साली विंग कमांडर या रँकवर माझी बदली झाली. सहज बोलता बोलता आमच्या क्वार्टर पासून ३/४ कि.मी.च्या अंतरावर एका अगस्त्य महाशिव वशिष्ठ नाडी केंद्राचा शोध लागला. एके दिवशी सकाळी मी त्या केंद्रात दाखल झालो. गेल्या गेल्या माझ्या उजव्या अंगठ्याचा छाप एका लहानशा कागदावर घेतल्यानंतर वेळाने मला एका छोट्याशा खोलीत बोलावण्यात आले.

तेथे फुटपट्टीच्या आकाराच्या दोन लाकडी पट्ट्यांमधे ओवून घट्टपणे अडकवलेल्या ५०-६० ताडपत्राच्या पट्ट्या असलेले बंडल घेऊन एक नाडी ग्रंथ वाचक माझ्याशी तमिळ-मध्ये धडाधड बोलायला लागला. त्याला थोपवून 'मला तमिळ येत नाही' म्हणताच त्यांच्यात चर्चा झाली व दुपारी एका भाषांतरकाराची सोय करून मला दुपारी पुन्हा बोलावण्यात आले. दुपारी मी पत्नीसह व एका फोटोग्राफरला बरोबर घेऊन केंद्रात पोचलो. आधीच्या लोकांच्या भविष्यकथना नंतर माझा नंबर लागायला ३ तास लागले. तोवर बरोबर

**विंग कमांडर ओक आपल्या पत्नीसमवेत नाडीपट्टीचे अवलोकन करीत असताना.**

आलेल्या फोटोग्राफरने ३ फोटो काढून काढता पाय घेतला ! त्यामुळे वेळेवर भविष्य पहायला आलेल्यांपैकी एकाला भाषांतरासाठी विनंती करून भविष्य वाचनाला सुरूवात झाली.

भविष्य ज्यावर लिहिलेले होते त्या ताडाच्या झाडाच्या झावळ्यांच्या पट्ट्या मी प्रथमच पहात होतो. माझ्या लक्षात आले की साधारण १-२ इंच रुंदीच्या व १५ ते २० इंच लांबीच्या आकारात कापून पट्ट्यांना मधे २ भोके पाडून त्यातून एक दोरी ओवून सर्व पट्ट्या माळेप्रमाणे गुंफल्या होत्या. पट्ट्या लवचिक असून त्यावर काही रासायनिक प्रक्रिया केल्यामुळे खूप वर्षे टिकाऊ झाल्या होत्या. त्यावर जाड लांबलचक खिळा हाताच्या मुठीत धरून हात न उचलता मराठीतील मोडी लिपीप्रमाणे अक्षरे एकमेकाला जोडून मजकूर लिहिला होता. मुखपृष्ठावरील संत तिरुवल्लुवरांच्या चित्रात ते या तऱ्हेने लिखाणास सिद्ध असल्याचे दिसते. सर्व बाजूला योग्य समास सोडून पाठपोट साधारण ९ ओळी लिहिलेल्या मजकुरातील काही भाग वाचत अगस्त्य मुनींना नमन करून नाडी वाचकाने माझे पत्र शोधण्यास सुरूवात केली. पट्टीतील मजकुराच्या अनुषंगाने तो विचारे की ज्याची ही पट्टी आहे, त्याला ३ भाऊ व २ बहिणी आहेत. तसे तुमचे आहे का? मला फक्त हो किंवा नाही असे उत्तर देण्यास सांगितले होते. त्याप्रमाणे मी नाही म्हणताच ती पट्टी खाली सरकावून तो पुढची पट्टी हातात घेऊन विचारे की या पट्टीतील व्यक्तीची माता जीवित नाही तसे तुमचे आहे का? मी नाही म्हणताच ती पट्टी खाली सरकवली जाई. कधी तुमचे नाव प फ ब भ या आद्याक्षरांनी सुरू होते का? नावात किती अक्षरे आहेत असेही प्रश्न विचारले जात होते. त्या दिवशी बंडला मागून बंडले संपली तेव्हा नाडीवाचक तोंड वाकडे करीत म्हणाला, 'इल्ले सामी, प्लीज कम नेक्स्ट मंथ.' पुढे महिन्याभराने गेलो तेव्हा माझ्या अंगठ्याच्या ठशाचे बंडल श्रीलंकेहून आल्याचे मला कळले. मध्यंतरीच्या काळात इतरांचे भविष्य पाहिल्याने मीही नाडी भविष्याला रुळलो होतो. यावेळी एक बंडल तसेच गेल्यावर पुढच्या बंडलातील ५-६ पत्रे गेल्यावर एका पट्टीत एकदम आईचे नाव-मंगला, वडिलांचे नाव - जनार्दन, तुमचे नाव - शशिकांत, पत्नीचे नाव - अलका असे धडाधड सांगितले गेले. याशिवाय

तुम्ही हे भविष्य वयाच्या ४५ व्या वर्षी पहात आहात. सध्या एक मुलगा व एक मुलगी असून विरोधि वरुषम (संवत्सर) आडि मासम, तमिळ तिथी १६, रविवार, चित्रा नक्षत्र, धनुसु लग्नम, कन्याराशी, असा कालमानाचा संपूर्ण आराखडा सांगितला गेला. तिथेच ४० वर्षांचे जाडजूड तमिळ पंचांग पडले होते, त्यात वर वर्णन केलेल्या दिनमानात कानामात्रेचाही फरक नव्हता व त्यासमोर माझी इंग्रजी जन्मतारीख लिहिली होती - ३१ जुलै १९४९ !

पुढे आईवडिलांचे प्रथम अपत्य, मुले माध्यमिक शालेय शिक्षण घेत आहेत, जातक विद्यावान देशसेवेच्या संरक्षणाच्या कार्यात सरकारी नोकरीत उच्चपदावर असा सरळ उल्लेख होता. शिवाय जन्मवेळेच्या ग्रहमानाप्रमाणे माझी पत्रिका सांगितली गेली. ती माझ्यापाशी असलेल्या पत्रिकेशी बरोबर जुळली. अशा तऱ्हेने लाखो पट्ट्यांतून माझी नेमकी पट्टी मिळाली होती. नंतर ताडपत्रावरील मजकूर एका ४० पानी वहीत नोंदला गेला व त्यात पाहून भाषांतरकाराच्या मदतीने एका टेपरेकॉर्डवर भविष्य टेप केले गेले. नाडी वाचकाने नंतर ती वही व टेप नम्रतापूर्वक झुकून माझ्या हाती सुपूर्त केली. या सर्वासाठी त्यावेळी १००रुपये भविष्याचे व २५ रुपये टेपचे असे एकूण १२५ रुपये घेतले गेले.

त्याच जनरल कांडात अगस्त्य महर्षींनी जातकाला (मला) इतर कांडातील विविध सूक्ष्म माहिती वाचण्याचा आदेश दिला होता. त्यामुळे पुढील कांडांचे वाचन करावे अशी उत्सुकता लागली. त्यावेळी लक्षात आले की साधारण १८ ते २० श्लोकांच्या ७० ८० ओळीत जातकाच्या सर्व आयुष्याचे भविष्य वर्तवले जाते. त्यातला पहिला भाग कोणाचे, कुठल्या कांडाचे वाचन चालू आहे याचे वर्णन येते. उदा. माझ्या संदर्भात प्रत्येक कांडाची सुरूवात - धनुसु लग्नम, कन्याराशी, जातकाचे नाव - शशिकांत, मातेचे नाव- मंगला, पित्याचे नाव- जनार्दन, व पत्नीचे नाव- अलका, व वयाच्या ४५व्या वर्षी हे भविष्य पहिले जात आहे असे सांगितले जाई. त्यामुळे इतरांच्या पट्टीतील मजकूर सांगितला जात नसल्याचे खात्रीशीर ठरत असे. त्यापुढे कांडांच्या अनुषंगाने महत्त्वाच्या एखाद्या घटनेचे वर्णन केले जाई व पूर्व जन्मातील पाप-पुण्याच्या कृत्यामुळे व सध्याच्या बऱ्यावाईट ग्रहमानामुळे काय होत आहे याचा उल्लेख येई. भविष्यातील वर्षाचा कधी एकेरीत तर कधी २-३ वर्षांच्या साखळीत उल्लेख होई. माझ्या बाबत एका कांडात सुरुवातीलाच अचूक घटनांचे वर्णन आले. उदाहरणार्थ- माझ्या पदोन्नतीस झालेली दिरंगाई, मुलांच्या शिक्षणात खंड, पत्नीस त्वचा रोग (त्या वेळी तिला एलर्जी मुळे खाज सुटण्याचा त्रास होता), वाहनापासून अपघात, (काही दिवसापूर्वी कारला समोरून येणाऱ्या वाहनाने धडक दिली होती. पण वेळीच दक्षता घेतल्याने कारच्या मोडतोडीवर व आम्हा कुटुंबीयांवर काहीही इजी न होता वेळ निभावली गेली होती.) एका कोर्ट कचेरीचा प्रसंग ! (प्रथम हे खरे वाटले नाही, कारण एअर फोर्स मधील नोकरीत कुठली कोर्ट कचेरी? पण पुढे डोके खाजवता लक्षात आले की काही महिन्यापूर्वीच आपण एका कोर्टमार्शलच्या संदर्भात महत्त्वाची साक्ष दिली होती !) या सणसणीत व ताडून पहाता येण्यासारख्या घटनांवरून माझी अशी खात्री झाली की भूतकाळ बरो[illegible]र सांगितला जात आहे. माझ्यामुळे एअर फोर्स मधील बरेच जण भविष्य पाहून गेले. प्रत्येकाला अचूक माहितीचा अनुभव आला.

मध्यंतरी अनेक वर्षे लोटली. अनेक केंद्रातून अनेक तऱ्हेच्या नाड्या वाचण्याचा अनुभव आला. महान शिवभक्त राजन अलदान, पुनित वालिया यांच्या समावेत गिरीप्रदक्षिणा, नवग्रह, शिवमंदिरांना भेटी असे अनेक अध्यात्मिक आनंदाचे अत्युच्च क्षण अनुभवले. श्वासोच्छवासाच्या स्पंदनावर आधारित चंद्रकला व सूर्यकला नाड्यांची अनुभूती मिळाली. महर्षींच्या प्रेरणेने या ग्रंथांचा परिचय संपूर्ण भारतभर होऊन अनेक शहरात नाडी केंद्रांची स्थापना झाली. यापुढे नाडी महर्षींच्या कार्याची सेवा विदेशात घडावी यासाठी प्रयत्न करण्याचा बेत आहे. १४ ऑक्टोबर २००७ ला पुण्यात नाडी ग्रंथांवर एक दिवसाचे अधिवेशन झाले. तो वृत्तांत अन्यत्र दिलेला आहे.

# नाडी ग्रंथ भविष्य प्रश्नोत्तरी

नाडी ग्रंथ भविष्याच्या संदर्भात वरचेवर विचारले जाणारे प्रश्न व उत्तरे यामधून नाडी ग्रंथाविषयी अधिक माहिती जाणून घेऊ या.

प्रश्न 'नाडी' म्हणजे काय ?

उत्तर – 'नाडी' हा शब्द मराठी भाषकांना एकतर मनगटावर बोटे टेकवून नसेचे स्पंदन अनुभवून त्याद्वारे आरोग्यासंबंधी उपाययोजना करण्याची पद्धत असे माहित असते. नाही तर मराठी विनोदी चित्रपटांचे बादशाह स्व. दादा कोंडके यांच्या अजागळ चड्डीची लोंबणारी दोरी म्हणून, नुसते आठवून हसायला येते.

मात्र याशिवाय गेल्या काही वर्षात नाडी शब्दाचा आणखी एक अर्थ असतो याचा शोध कित्येक मराठी भाषकांना गेल्या काही वर्षात लागला आहे. याचे कारण म्हणजे 'नाडी' ग्रंथ भविष्याचे महाराष्ट्रात आगमन.

'नाडी' ह्या शब्दाचा अर्थ तमिळ भाषेत शोध घेणे, शोधात असणे असा आहे. तर एका शब्दकोशाच्या आधारे त्याचा अर्थ अत्यंत मोठ्या प्रमाणात साठवलेले ज्ञान किंवा संहिता असा आहे. या दोन्हीचा एकत्र अर्थ केला तर असे म्हणता येईल की तमिळ भाषेत ताडपत्रावर कूट लिपीमध्ये कोरून लिहिलेली व्यक्तिविशेषाची भविष्य कथने म्हणजे नाडी. ताडपत्रावर लिहलेले नाडी पट्ट्या हे भविष्यग्रंथ होत.

प्रश्न – 'नाडी' ग्रंथ कोणी लिहिले ?

उत्तर – आपण ज्या ऋषी महर्षींची नावे रामायण, महाभारत, भागवत आदी धार्मिक ग्रंथात वाचतो, त्या वसिष्ठ, विश्वामित्र, पराशर, भृगु, अगस्त्य काक भृशुंडी, शुक, अत्री, मार्कंडेय, कौशिक आदी महर्षींच्या नावाने नाडी ग्रंथ उपलब्ध आहेत. याशिवाय नंदी, विनायक, पुलीपाणी, बोहर, बुध, मीनाक्षी, मच्छ, सिंह, सदानंद जेमिनी, धन्वंतरी आदी उत्तर भारतीयांना अपरिचित महर्षींनींही नाडी ग्रंथ लेखन केले आहे. आता प्रश्न पडेल की ही रचना त्यांनीच केली हे कशावरून ? याचे उत्तर असे की प्रत्येक भविष्य कथनाच्या वेळी प्रथम शिवपार्वतीला (ईश्वराला) वंदन करून त्या त्या नाडीचे महर्षी म्हणतात, "या जातकाचे (भविष्य जाणण्यास उत्सुक व्यक्तीचे) भविष्यफळ कथन करण्याची मला म्हणजेच अगस्त्य/वशिष्ठ/अथवा अन्य महर्षी-प्रेरणा द्या" असा कृपा आशीर्वाद मागतात. स्तुती १/२ श्लोकातून वर्णन केली जाते. त्यामुळे प्रत्येक वेळी त्या त्या महर्षींचे नाव असल्याने त्या ग्रंथांची निर्मिती त्या महर्षींच्या नावाने केली असे म्हणावे लागते. तथापि हे रचना-कार्य एका व्यक्तीच्या जीवनापुरते नसून पिढ्यानूपिढ्या चाललेले काम असल्याने अगस्त्य, अत्री ही घराणी किंवा उपनावे असावीत. आजकाल देखील वसिष्ठ, कौशिक आडनावे असलेले किती तरी लोक विशेषत: उत्तर भारतात भेटतात.

आत्तापर्यंत अनेकांनी अनुभवलेल्या नाडी भविष्यामधून ७२ महर्षींचे उल्लेख आले आहे.

प्रश्न – नाडी ग्रंथ भविष्य का पाहावे ?

उत्तर – प्रत्येक व्यक्तीच्या जीवनात असे प्रसंग येतात की त्यावर कशी मात करता येईल याचे नक्की मार्गदर्शन करणारे कोणी मिळत नाहीत. कोर्टात केस करावी का ? त्यात अपयश येईल का ? या प्रश्नाचे उत्तर कायद्याच्या विषयात निष्णात काळ्या कोटातील वकील, "तुम्ही हरणार – कोर्टाची पायरी चढू नका" असे कधीच सांगत नाहीत. त्यांना केस जिंकता येणार नाही याची खात्री असूनही ते अशीलाला "नक्की जिंकून देतो" असे सांगतात. ही त्यांच्या धंद्याची मेख आहे. अशा वेळी अत्यंत रोखठोक शब्दात 'केस लढू नये. हरावे लागेल. निवडणुकीला उभे राहू नये. विजय मिळणार नाही,' असे नाडी ग्रंथातून खणखणीतपणे सांगून वेळीच जागे केले जाते. त्यामुळे एक

नि:पक्ष सल्लागार म्हणून नाडी ग्रंथाचे अवलोकन होते.

नोकरी मिळणे; मिळाली तर न टिकणे, धंद्यात खोट, असाध्य रोग, रेंगाळलेली लग्ने, प्रमोशन अशा अनेक प्रापंचिक चिंता भेडसावत असतात. त्यांना योग्य मार्गदर्शन करून व्यक्तीच्या कर्तृत्वाला प्राधान्य दिले जाते. तथापि सर्वच गोष्टी मानवी कर्तृत्वाच्या आवाक्यात नसतात. अभ्यास करून करणे आपल्या हातात आहे. मात्र गुण देणे, दर्जा ठरवणे आपल्या हाती नाही. तसेच आपल्या श्रम, कष्टाच्या शिवाय अन्य घटक-जे कार्याला यशस्वी करायला लागतात ते-आपल्या बाजूने असावेत, निदान विरोधात जाऊ नयेत आदी कारणांसाठी, काही धार्मिक पूजा, अर्चना, जपजाप्य, अन्नदान, वस्त्रदान, जलदान किंवा पैशाचे दान करण्यास सुचविले जाते. त्याद्वारे नाडीतून मार्गदर्शन मिळून आपले पेच/तात्कालिक समस्यांचे निराकरण केले जाते, म्हणून एक मार्गदर्शक, विचारी, सद्भावनेचा सल्ला देणारे म्हणून नाडी ग्रंथ भविष्याचे अवलोकन करावे.

याशिवाय काहींना या भविष्य कथनाच्या पद्धतीचा, ज्ञानाचा शोध घेण्याची इच्छा होते, त्यांना वैयक्तिक भविष्यात रस नसतो. पण ही संहिता कधी, कशी, कुठे लिहिली असावी ? कोणती लिपी वापरली ? लेखनकार्य कसे केले असेल ? किती वर्षे ते चालले असेल आदी कुतूहले आकर्षित करतात. ते त्या मार्गाने नाडी ग्रंथाचा आस्वाद घेतात.

**प्रश्न - एखाद्या नाडी केंद्रात नाडी पट्टी मिळाली नाही तर १/२ महिने थांबा व त्या पट्ट्यांचा स्टॉक आला की पुन्हा विचारणा करा असे सुचवले जाते तेवढा वेळ थांबणे शक्य नसते. त्या वेळी काय करावे ?**

उत्तर - नाडी भविष्य पाहायचे ठिकाण ज्या शहरात असेल त्याच शहरातील अन्य नाडी भविष्य केंद्रातूनही आधीच अपॉइंटमेंट घेऊन ठेवावी. एके ठिकाणी निराशा झाली तर दुसऱ्या केंद्रातून भविष्य पाहायला जाता येते. बऱ्याच वेळा अशा दुसऱ्या केंद्रात पट्टी सहजासहजी सापडून जाते. मात्र ही कामे दिवसभर मोडणारी असल्याने त्या अनुरूप वेळेची आखणी करावी.

**प्रश्न - शांती दीक्षा कांडात सांगितलेली कर्मे करूनही नंतर भविष्य पाहिले तर पुन्हा शांती दीक्षा करावी काय ?**

उत्तर - अनेकांना उत्सुकतेपोटी, अनिवार्य घटनाक्रमामुळे किंवा सहजपणे नाडी ग्रंथ पाहायची संधी येते. त्यातील भविष्यकथनाच्या समवेत काही पूजा, अर्चना, जप आदी करण्याचे पुन्हा सुचवले जाते. त्या वेळी मनात साहजिक प्रश्न उद्भवतो की आधी केलेल्या शांती दीक्षेचे काय ? ती केली तरी पुन्हा मी का करावी ? समजा आणखी काही वेळा नाडीपट्ट्यांचे अवलोकन करण्याची वेळ आली तर प्रत्येक वेळी असे सोपस्कार करायचे तरी किती वेळा ?

नाडी ग्रंथाची रचना व्यक्तीच्या सांसारिक चिंता/कटकटी/आजार यांच्यावर यशस्वीपणे मात करण्यासाठी केलेली आहे. त्या महर्षींना भविष्य प्रज्ञाचक्षूंनी पाहता येते तसे त्यांना आपल्या पूर्वकर्मांची, पूर्वजन्मातील बऱ्यावाईट कर्मांची मांडणीही समजून येते. करुणेच्या सद्भावनेने त्यांनी एखाद्याला एकापेक्षा जास्त वेळा नाडीपट्ट्या पाहण्याची संधी मिळाली तर त्यांना याचीही पूर्ण कल्पना असते की याने आधी सुचवलेली शांती दीक्षा केली अथवा नाही. कारण अनेकदा असे सरळ म्हटले जाते पूर्वी सुचवून पण शांती दीक्षा केलेली नाही आता तरी कर. अन्यथा कथन केलेले अपेक्षित भविष्य सफल होणार नाही. कधी महर्षी असेही म्हणतात, "तू केलेली शांती दीक्षा मला मिळाली तरीही मी पुन्हा सुचवलेली शांती दीक्षा जरूर करावी," यामागे महर्षींना त्याच्या पूर्वकर्मातील उरलेल्या कृत्यांसाठी आणखी शांती दीक्षा करणे अपेक्षित असते. ही व्यक्ती पुन्हा नाडी ग्रंथ पाहील त्या वेळी आणखी सोपस्कार सांगू. सर्व एकदम सांगितले तर पैसा, वेळा, मानसिक स्वास्थ्य या कारणांनी तो काहीच करणार नाही. याला हप्त्याहप्त्याने सांगणे सयुक्तिक असेल असे म्हणावे लागते. कधी कधी काही सोपस्कार करायची गरज नाही असे म्हटले जाते. मी स्वत: या सर्व तऱ्हेच्या कथनांचा अनुभव घेतला आहे.

प्रकरण ३

# चला नवग्रह मंदिरांच्या यात्रेला

## १) सूर्यस्थान-सूर्यनार कोईल

(कुंभकोणम पासून १५ कि. मी. दूर)

**महर्षी व्यास कृत सूर्य ग्रहस्तोत्र**

**जपाकुसुम संकाशं काश्यपेय महाद्युतिम॥**
**तमोरीं सर्व पापघ्नम प्रणतोस्मि दिवाकरम॥**

**अर्थ - ज्यामुळे तळपत्या दिवसाची सुरुवात होते अशा सूर्याला माझा नमस्कार असो. काश्यप महर्षींच्या पुत्रा, तुझ्यामुळे अज्ञान तिमिराचा व सर्व पापांचा विनाश घडो.**

**आदित्य गायत्री-**

ओंम अश्वध्वजाय विद्महे पाशहस्ताय धीमहि
तन्नो सूर्यः प्रचोदयात ।

**कथा** - सात घोड्यावर आरूढ (प्रकाश किरणांच्या सप्तरंगांना एकत्र करून) एका चाकाच्या (एका पांढऱ्या रंगाच्या रुपाने) रथावर आरूढ होऊन काश्यप पुत्र सूर्य, देव-दानवांना समानपणे प्रकाश व उष्णता देऊन जीवन प्रदान करतो. सूर्याच्या रथाचे सारथ्य अरूण करतो. सूर्याच्या प्रकाशाची व अति उष्णतेची विनाशक तीव्रता अरुण नियंत्रित करतो असे मानले जाते. सूर्याच्या उषा व छाया या दोन अर्धांगिनी असून, लाल कमल हे त्याचे आवडते पुष्प आहे. वाहन मोराचा रथ आहे. रंग - लालसर पिवळा अग्नितत्वाच्या या देवाची रास सिंह आहे.

**मंदिराची रचना** - हे मंदिर कावेरी नदीच्या तीरावर वसलेल्या कुंभमेळ्याच्या तोडीचे पावित्र्य असलेल्या कुंभकोणम जवळ आहे. छोटेसे पण टुमदार मंदीर पश्चिम मुखी आहे. या मंदिराचे आणखी वैशिष्ट्य म्हणजे अन्य नवग्रह मंदिरात शिवाच्या पिंडीला मध्यवर्ती स्थान दिलेले असते. तसे न होता, तेथे सूर्य हाच मूलावर - मुख्य मूर्ती म्हणून

### श्रद्धाळू दक्षिणेची ही भावपूर्ण यात्रा कशासाठी ?

**सनातन धर्माच्या तत्वज्ञानाचे दोन प्रमुख आधार आहेत. एक - पुनर्जन्म सिद्धांत तर दुसरा - कर्मफल सिद्धांत. पुनर्जन्म मानावा तर पुरावा काय हा असा संभ्रम होतो. त्याला पुरावा म्हणून नाडी ग्रंथ भविष्य हे भक्कम आधार किंवा पुरावे आहेत. कारण व्यक्तिच्या पूर्वजन्मातील कर्मफले त्याच्या सध्याच्या परिस्थितीला जबाबदार असतात. असो.**

**नाडीकर्ते महर्षी आपल्या अतिंद्रीय ज्ञानाचा बळावर सांगतात की त्या पूर्वजन्मातील कुकर्मावर** सध्याच्या जन्मातील सत्कर्मांनी मात करता येते. ती कशी करावी याचे मार्गदर्शन नाडी महर्षी प्रामुख्याने १३ व १४ व्या कांडातून करतात.

मंदिरांना भेटी, अन्नदान, वस्त्रदान, जलदान, दक्षिणा, दीप-दर्शन, दीनदुखी लोकांची आपल्या परीने सेवा करून त्यांच्या तृप्ती व आनंदाचे आशीर्वादात्मक तरंग - स्पंदने मिळवायची असतात. ते आशीर्वाद आपल्या पूर्व कृत्यांच्या वाईट - नकारात्मक भावनांचा नाश करतात व मनुष्याला या जन्मात त्या पापापासून मुक्ती होते, असे या मागचे शास्त्र आहे. आता या बाबत पाश्चात्य देशात प्रयोगशाळेत शोधकार्य करून पुनर्जन्म सिद्धांत सत्य म्हणून मान्यता पावला आहे.

काही धर्म संकल्पनांमध्ये पुनर्जन्माला मान्यता नाही. परंतु अंतिम निवाड्यापर्यंत खोळंबलेले आत्मे निवाड्यानंतर ज्या स्वर्गात पोचणार तेथे त्यांचा एका अर्थाने पुनर्जन्मच होणार आहे. पुनर्जन्माला आधार कर्मफल सिद्धांत असून बऱ्या-वाईट कर्मांच्या आधारे पुनर्जन्म भोगण्यासाठी

स्थापित केला गेला आहे.

प्रवेश द्वारावरील राज गोपुरम तीन मजली असून त्याला पाच कळस आहेत. सूर्य देवतेची मूर्ती उभी असून, मंदिरचा आकार रथासारथा आहे. मंदिरात सूर्यदेवासमोर एक - बृहस्पतीची मूर्ती आहे. या भागाला एरू मंडप म्हणतात. त्याच्या पूर्व दिशेला सभानायक मंडप असून तेथे नवग्रहांच्या मूर्ती आहेत. या भागात दगडी घोडा आहे तो सूर्याच्या सात घोड्यांचे प्रतीक आहे. या परिसरात अन्य आठ ग्रहांची छोटी मंदिरे आहेत. प्रत्येकाला प्रदक्षिणा घालण्यासाठी वाट आहे. या सर्व ग्रहदेवता शस्त्रधारी नाहीत. शुभेच्छादर्शक अंगुली मुद्रेत' किंवा 'अभयहस्त' मुद्रेत आहेत.

**मंदिराचा इतिहास** - हे मंदिर या स्वरूपात निर्माण करण्याचे श्रेय चोल राजा (इ.स. १०७०-११२२) याला जाते. मात्र मान्यताप्राप्त कवी इलंगो यांच्या 'शिलप्पणकरम' या महाकाव्यातील कावेरीच्या त्रिभूज प्रदेशातील सूर्यमंदिराचा उल्लेख असे दर्शवतो की ११ व्या शतकात चोल राजा - 'कुलोत्तुंग' याने त्या पूर्वीच्या अतिप्राचीन मंदिराचा जीर्णोद्धार केला असावा. त्यामुळे १३ व्या शतकातील ओरिसा राज्यातील कोणार्क सूर्य मंदिरापेक्षा हे मंदीर नक्कीच पुरातन आहे.

मंदिरातील उत्सव - पोंगल (मकर संक्रांती नंतर) रथ सप्तमी हा महत्वाचा सण. तो जर रविवारी रोहिणी नक्षत्रात असेल तर विशेष पवित्र मानला जातो. वेलरुक्कु या वृक्षाला तेथे पवित्र मानले जाते. आपण मागितलेली इच्छा पूर्ण झाली तर आभार प्रदर्शक वस्त्रे वृक्षाला बांधण्याचा प्रघात आहे. या वृक्षाची दोन पाने खाऊन येथील कुंडात स्नान करणे शुभ मानतात.

नाडी ग्रंथ भविष्यात सामान्यत: सूर्यमंदिरात प्रथम पूजा करावी लागते. तेथे विनायक व नवग्रहांची पूजा करून प्रदक्षिणा करणे अपेक्षित आहे. शक्यतो पहाटे मंदिर कचेरीत परवडेल अशा किंमतची पूजा तिकीटे फाडून अर्चना करता येते. साधारण २ ते ३ तास लागतात. बाहेर काशायवस्त्रात काही साधू अन्नदानासाठी मिळतात. तेही काम उरकता येते. नाडी ग्रंथाप्रमाणे शांति-दीक्षा करणाऱ्यांनी या मंदिरात नव ग्रहांच्या पूजेसाठी आवर्जून जावे.

**कंडीयूरचे सूर्यमंदिर** - कुंभकोणम पासून २२ कि. मी. वर आणखी एक सूर्य मंदिर आहे. शिवांनी तेथे सूर्योपासना केल होती अशी मान्यता आहे. सातव्या शतकातील ज्ञान संबंधर व तिरु नवकरसू या कवींच्या काव्यातून या मंदिराचे उल्लेख मिळतात. या मंदिरात शिवाणम प्रतिष्ठा नावाची मूर्ती रचना आहे. त्यात सूर्य मध्ये व उरलेले आठ ग्रह आठ दिशांना असे मानले आहेत.

**नैवेद्यम** - शकराई पोंगल किंवा साखरेचा मूग घालून केलेला भात.

घ्यावा लागतो. सध्याच्या काळात नैतिकतेच्या तत्वज्ञानातून कर्माला सत्कर्म किंवा कुकर्म अशा पारड्यात घालून व्यक्तींच्या कर्मांचा विचार केला जातो आणि व्यक्तीला चालू जीवनात दंड किंवा शिक्षा अथवा मान-प्रशंसा मिळून न्याय होतो. मात्र ही नैतिकता सोईनुसार कुकर्मांवर शालीप्रमाणे पांघरून खोटी प्रतिष्ठा मिरवता येते. पण पुनर्जन्म सिद्धांतातून कुकर्मांची नोंद आकाशिक लेखनाद्वारे केली असल्यामुळे या किंवा नंतरच्या जन्मात त्याची भरपाई केल्याशिवाय सुटका होत नाही. योगी अरविंदांनी सावित्री या महाकाव्यात Fruits of forgotten deeds (न आठवण्याच्या पुनर्जन्मातील कर्मफळे) असे याबाबत म्हटले आहे. ती फळे मानवाला भोगणे प्राप्त आहे.

हिंदू संस्कृतीच्या अनेक वैशिष्ट्यामध्ये नवग्रह देवतांचे स्थान अद्‌भूत आहे. ज्योतिषशास्त्राला उपवेदाचा मान आहे. या शास्त्राचा आधार आकाशस्थ ग्रहगोलांचे भ्रमण व त्यांचा पृथ्वीवरील जीवनावर होणारा बरा-वाईट परिणाम आहे. याचे रहस्य प्राचीन काळापासून ऋषीमुनींना ज्ञात झाले. त्यांनी प्रज्ञा, अनुमान व निरीक्षणाच्या आधारे त्यांचे नियम बनवले आणि मानवी बदलांची काटेकोरपणे नोंद केली.

ज्या ग्रहगोलांच्या भ्रमणाच्या कक्षा व त्या परिसरातील अवकाशाचे निरीक्षण झाले त्यातून प्रत्येक ग्रहाचे नाव, त्याची भ्रमणाची चुंबकीय शक्ती, त्यावरून येणारे किरण किंवा इलेक्ट्रो-

## २) चंद्र स्थान - तिंगलूर

**(कुंभकोणम पासून २२ कि. मी. दूर)**

**महर्षी व्यास कृत चंद्रग्रह स्तोत्र**

**दधिशंख तुषाराभं क्षीरोदार्णव संभवम ।**

**नमामि शशिनं सोम शंभोर्मुकुट भूषणम ॥**

**अर्थ - क्षीरसागरातून उत्पन्न, अतिशुभ्र असा जो चंद्र सदैव शिवांच्या मस्तकावर विराजमान असतो त्याला माझा नमस्कार असो.**

**अधिदेव गायत्री -**

**ओंम पद्मध्वजाय विदमहे हेमरूपाय धीमहि तन्नो सोमः प्रचोदयात ।**

तमिळ भाषेत तिंगल म्हणजे चंद्र व ऊर म्हणजे गाव म्हणून तिंगलूर याचा अर्थ चंद्राचे गाव. असे हे चंद्राचे गाव कावेरी नदीच्या काठाने जाणाऱ्या रस्त्यावर आहे. वाटेत हिरव्यागार भात शेतीची डौलदार पेरणी दिसते. खळखळणारे कालव्याचे पाणी, केळीच्या बागा, नारळाची वने यामुळे हा परिसर अत्यंत रमणीय आहे.

मंदिराचा मुख्य भाग टुमदार आहे. शिवकैलास नाथर व पेरीयनायकी पार्वतीच्या रूपात येथे दिसतात. आजूबाजूला सूर्य नारायण आपल्या उषा व छाया नामक पत्नींच्या समावेत असून विनायक, कार्तिकेय आदींच्या मूर्तीही तेथे आहेत. येथे शिव दक्षिणमूर्ती या रूपात असून एका हातात ताडपत्राचे पुस्तक, दुसऱ्या हाताची बोटे गालाशी टेकवून चिंतनशील मुद्रेत पद्मासनात बसलेले आहेत. म्हणून त्यांना शिवयोगी म्हणतात. अशा शिवांच्या पायाशी मुयालागण या उद्दामपणा व अज्ञानाचे प्रतीक असलेल्या विरोधकांचा पायांनी तुडवून बंदोबस्त केल्याचे ते प्रतीक आहे. साधारण ७ व्या शतकात या मंदिराची पुनरुद्धार झाला असावा असे मानण्यात येतो. या शिवाय तिरु देवेंकाडू नावाचे आणखी एक मंदीर चंद्र देवतेसाठी प्रसिद्ध आहे. कुंभकोणम पासून उडार वण येथून जवळ कावेरी नदीच्या किनारी या मंदिरात कर्काटकेश्वर जेथे खेकडा शिवपिंडीला फुले वाहून पूजा करत आहे अशी मूर्ती आहे. अपूर्वनायकी ही याची सहचारिणी आहे. या मंदिराला नंदाल उर्फ खेकडा मंदीर ही म्हणतात. हिरव्यागार पाचूच्या समान भातशेताच्या मधून जाणारा रस्ता थेट मंदिरापाशी पोचतो.

या मंदिरात कर्क दोष किंवा चंद्र दोषासाठी प्रार्थना व पूजा केली जाते. या मंदिरात चंद्र बसलेल्या अवस्थेत असून त्यातून तो शिवाच्या इतकाच ताकतीचा आहे असे दर्शवले आहे. अन्य ग्रहांच्या मंदिरातील मूर्ती सामान्यत: उभ्या असतात.

नैवेद्यम - दहीर सादम (उच्चार दईरसदम

दही घालून कालवलेला भात. वर चरचरीत फोडणी - त्यात चवीला कैरी व अन्य मौसमी फळांच्या छोट्या फोडी टाकून रूचकर बनवलेला पदार्थ.

मॅग्नेटिक तरंग किंवा लहरी यावरून ग्रहांना मानवी रूप व स्वभावधर्म देण्यात आले. पूजाआवी मानवी संस्कृतीने त्यांना, देवता स्वरूप मानले. आराधना, साधना करून त्या देवतांचा भावनिक आधार प्राप्त करून घेण्यासाठी त्यांना देवत्व देऊन मंदिरात स्थापना केली.

दक्षिण भारतात नवग्रह मंदिरांची वैशिष्ठ्यपूर्ण निर्मिती कावेरी नदीच्या खोऱ्यात कुंभकोणम भागात प्रामुख्याने झाली. गेल्या १५०० ते २००० वर्षांच्या इतिहासात या मंदिरांचा उल्लेख अनेक प्राचीन काव्यातून, भक्तिगीतातून वरचेवर होतो. शिवमंदिरातील पिंडीच्या खालोखाल या मंदिरांना मान मिळतो. हजारो भाविक नाडी ग्रंथांतील आदेशाप्रमाणे या नवग्रह मंदिरांना भेट देतात. महाराष्ट्रातील शिंगणापूर येथील शनि-मंदीर, कोणार्क येथील सूर्यमंदीर. काश्मीर खोऱ्यातील अवंतीपूर येथील मार्तंड-मंदीर ही इतर ग्रह मंदिरे प्रसिद्ध आहेत. याशिवाय अनेक मंदिरे काळाच्या ओघात, विविध कारणांनी नष्ट झाली. मंदिरे ही पूर्वीच्या काळात धार्मिक, सांस्कृतिक व राजकीय कार्याची प्रमुख केंद्रे होती. मंदिरांची निर्मिती, संरक्षण, देखभाल व अर्थार्जन हे सारे त्या परिसरातील राजे राजवाडे, श्रीमंत व्यापारी, विद्वान ब्राह्मणांच्या-तर्फे केले जात असे. अशा या ग्रहांच्या स्थानांची-मंदिरांची ओळख तेथे प्रत्यक्ष जाऊ इच्छिणाऱ्यांसाठी करून देण्यात येत आहे.

## ३) मंगळस्थान वैदीश्वरन कोईल

(कुंभकोणम पासून ५० कि. मी. दूर नाडी ग्रंथ भविष्यासाठी सुप्रसिद्ध गाव)

महर्षी व्यास कृत मंगळस्तोत्र

धरणी गर्भ संभूतम विद्युत कांति समप्रभम ॥

कुमारं शक्ति हस्तं तं मंडलम प्रणमाम्यहम ॥

**अर्थ** - शक्ती स्वरूप विद्युत हाती घेतलेल्या व अति शुभ्र कांतीच्या धरणी - पृथ्वी पुत्राला माझा नमस्कार असो.

**अंगारक गायत्री** -

ओंम वीरध्वजाय विद्महे विघ्नहस्ताय धीमहि तन्नो भौम - प्रचोदयात ।

सर्व ग्रहात ताम्र लाल रंगाचा, लाल पोषाख, रक्त वर्णीय फुलांचा चाहता मंगल किंवा भौम -भूमिपुत्र आपल्या उग्र तेजाने तळपून जनामध्ये भीतीयुक्त आदर निर्माण करणाऱ्या या ग्रहाचे हे मंदीर आहे. वैदीश्वरन कोईल या मंदिरात शिवाच्या शिवाय औषधांचा अधिपती वैद्यनाथ-तैय्यल नायकी या औषधी तेलासाठी प्रसिद्ध आहे. पूर्वेला भैरव, पश्चिमेला वीरभद्र, उत्तरेला काली व दक्षिणेला कर्पण विनायक व दुर्गादेवी यांची उपमंदिरे आहेत.

मंगळाची मूर्ती मेंढ्यावर स्वार, एका हातात गदा, आठ घोड्यांचा सुवर्ण रथावर आरूढ मंगळ ग्रहाला, अंगारक कूजा, शक्तीधरा, लोहिता, रक्तवर्णा आदि नावे तमिळ लोकात प्रसिद्ध आहेत. मंगळदशेचा प्रभाव तीव्रयुद्धजन्य परिस्थिती निर्माण करणारा आहे. सेनादलात किंवा औषध देण्याच्या कामी चाकरी करणाऱ्या लोकांच्या कुंडलीत मंगळाचे स्थान प्रभावी असते. सेल्व मुत्थुकुमार स्वामीचे येथील मंदीरही मंगळ ग्रहाप्रमाणे या शिवमंदिरात प्रमुख आहे.

वैदीश्वरन कोईल हे गाव नाडी ग्रंथ भविष्यासाठी प्रसिद्ध पावले आहे. (वैद्यरूपातील शिव त्यांचे कोईल म्हणजे - मंदीर) नाडी ग्रंथाच्या ताडपट्ट्यांचा साठा या मंदिरात फार पूर्वी पासून होता. भविष्य कोरलेल्या ताडपट्ट्यांचे प्रचंड साठे या मंदिरात जतन केले जात असत. मंदिराच्या तळघरात मोठ्या मोठ्या लाकडी पेट्यात ताडपट्ट्यांचे साठे आहेत असे सांगणारे वृद्ध येथे भेटतात. शिवाय या मंदिराच्या तीन बाजूंनी लहानमोठी दुकाने थाटून आपल्या जवळील पट्ट्यांवरून भविष्यकथन करण्याचा व्यवसाय मोठ्या प्रमाणात चालतो. शांती-दीक्षा कांडात वर्णन केलेल्या पूजा व जपसाधना या ठिकाणी केल्या जातात. मात्र याचा गवगवा फार केला जात नाही.

**इतिहास** - साधारण एक हजार वर्षांपेक्षा प्राचीन या मंदिराच्या भव्यतेत वेळोवेळी भर घालून वाढ केल्याचे तेथील वास्तुकलेवरून लक्षात येते. उतरत्या श्रेणीने कलाकुसर केलेल्या भिंती व स्तंभ नंतरच्या काळातील वाढवलेल्या भागांतील ओबडधोबड शिल्पातील कारागिरी उपदेवतांच्या व मंडपातील मिरीचे काळे दाणे व मीठ, गूळ यांची आहूती प्रसिद्ध आहे. येथील जटायू कुंडममध्ये रामायणातील जटायू व संपातीच्या मृत्यूची कथा प्रमूख आहे.

येथील एका बाह्य मंडपात तंजावूरच्या राजाची व प्रधानाची मूर्ती खांबात कोरली आहे. त्यामुळे त्यांच्या प्रेरणेने मंदिराच्या विस्ताराचे व नाडी ग्रंथपट्ट्यांच्या पुनर्लेखनाचे काम हाती घेतले गेले असल्याची खात्री पटते. ज्यांना मंगळ ग्रहाची पीडा आहे, ज्यांना संधीवाताचे दुखणे आहे, भविष्य पाहायच्या नादात या मंदिराला वेळ काढून भेट देणे जमत नाही. या सबबीमुळे मंगळाचा प्रभाव जीवनात जाणवला की या मंदिराच्या भेटीची धावाधाव करावी लागते.

**नैवेद्यम** - तुवरम गपरप्पु सादगम

तुरीच्या डाळीसह बनवलेला तिखटसर सरबरीत भात. त्याला ठसकेबाज तडका. असा हा बेत असतो.

प्रख्यात इतिहासकार व ज्योतिर्विद श्री.पुरुषोत्तम नागेश ओक यांचे पुण्यात दिनांक ४ डिसेंबर २००७ रोजी देहावसान झाले. त्या माझ्या काकांना आदर श्रद्धांजली.

## ४) बुध स्थान - तिरुवेंकाडू

**(कावेरी नदीच्या तीरावर वैदीश्वरन कोईल पासून ११ कि. मी. दूर सर्वात प्राचीन ३ हजार वर्षापूर्वीचे काही भाग या मंदिरात आहेत. पूमपुहार या बंदरापाशी कावेरी नदी समुद्राला मिळते त्या वाटेवरील हे मंदीर रचनेने छोटेसे आहे.)**

**महर्षी व्यास कृत बुध ग्रहस्तोत्र**

**प्रियंगु कलिका शामं रूपेण प्रतितम बुधम ॥**

**सौम्यं सौमगुणोपेतमगतं बुधम प्रणमाम्यहम ॥**

**अर्थ - अप्रतीम रूप, वर्णाने मावळा, सौम्य व शांत स्वभाव असणाऱ्या बुधाला माझे वंदन असो.**

बुध गायत्री

ओम गजध्वजाय विद्महे सुडहस्ताय धीमहि

तन्नो बुधः प्रचोदयात ।

तमिळमध्ये तिरू म्हणजे संस्कृत मधील श्री. वेन-श्वेत, काडू - अरण्य म्हणजे श्वेत वृक्षांचे अरण्य असलेला वन प्रदेशय बुध चंद्राचा पुत्र व पुरुरव्याचा पिता. चंद्रवंशीय प्रजेचा जनक. हिरव्या अंगरख्याने युक्त अश्वारुढ बुधाच्या तीन हातात तलवारी व एका हातात गदा ही असे आहे. बुधाचे मंदीर तसे लहान व थोडेसे आत असल्याने व त्या मंदिरात अनेक उपदेवतांमुळे नाडीपट्टीत सांगितलेल्या योग्य देवतेची पूजा करण्याआधी खात्री करावी. भाषेच्या अडचणीमुळे कधी कधी अपसमज होऊ शकतो. शिवांनी मरुतवाहन राक्षसाचा नाश करण्यासाठी अघोररूप धारण केले. त्या अघोरमूर्तीचे दर्शन येथे होते. त्यांचे ते रूप पाहताना थरकाप होतो. या युद्धात नंदीच्या शरीराला नऊ ठिकाणी जखमा झाल्या. ते दर्शवणारी त्याची मूर्ती येथे आहे. शिवाय सूर्य, चंद्र व अग्नीतीर्थ हे तलाव पाहायला मिळतात. येथील वृक्ष वनकंदल असून जवळच आदि चिदंबरम मंदिराप्रमाणे हस्तिनटनम या नृत्यप्रकारात शिवांचे दर्शन होते. माघमासात १२ दिवसांचा उत्सव साजरा केला जातो.

**नैवेद्यम - शुंडल**

हिरव्यामुगा समावेत भाताच्या खिचडीला मोहरी व कढीपत्याची फोडणी. वर नारळाच्या किसाची पखरण.

---

### तमिळनाडू मधील आणखी काही वैशिष्ट्यपूर्ण मंदिरे

**नवग्रहांशिवाय तमिळनाडूतील काही स्थाने अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण असून त्यांचा उल्लेख वारंवार नाडी ग्रंथांतून केला जातो. काही विशिष्ट कामासाठी, संकट निवारणासाठी, आरोग्य समस्येसाठी या स्थानांना भेट देण्याचे सांगण्यात येते. अशा विशेष मंदिर स्थानांची थोडक्यात ओळख.**

**(१) तिरुमनन चेरी येथील शिव-पार्वतीचे कल्याण सुंदरम मंदिर - विवाह समस्येवर उपाययोजना**

**दिसायला सुंदर, शिक्षणात हुशार,** गृहकृत्यदक्ष, भरपूर पगाराची नोकरी, घरची परिस्थिती छान, पत्रिका पटकन जुळणारी, अशा वर्णनाची वधू आणि बळकट प्रकृतीचा, कर्तृत्ववान, लठ्ठ पगाराच्या नोकरीवर, विदेशात वाऱ्या-करूनही भारतीय वधूशी लग्न करू इच्छिणाऱ्या आदि सुरस वर्णनाच्या वरांचे विवाहयोग पटकन जमत नाहीत असे कित्येकदा घडते. त्यावर मात म्हणून नाडी महर्षी तिरुमननचेरीच्या मंदिरातून हार घालायच्या सोहळ्यातून शिवपार्वतीचे आशीर्वाद घ्यायला सांगतात. प्रस्तुत लेखकांच्या अपत्यांनाही नाडी ग्रंथांच्या वाचनातून असाच आदेश आला होता.

तिरुमनन चेरी हे गाव मइलाडुदुरै (मायावरम) पासून २५ कि.मी. वर आहे. सकाळी आठ पर्यंत पोहोचावे. १० रुपयांचे पूजेचे तिकिट काढावे. २५-३५ रु. चा हार पूजा साहित्य घ्यावे. व प्रवेशासाठी थांबावे. वेळ झाली की एका बाजूला उपवर तर दुसऱ्या बाजूला उपवधू यांना ओळीने बसवतात. मध्यभागाच्या जागेत विवाहित जोडप्यांनी बसायचे असते. अन्य भाविकांनी थोडे मागे बसून घ्यायचे असते. अर्चनेच्या फुलांचा हाराचा स्वीकार करत एक पुजारी मुख्यमूर्तीशी मांडामांड करतात. तामिळ मधून आरती पूजा होते. नंतर मुख्य पुजारी उपस्थित उपवधू-वरांना

## ५) गुरु स्थान - अलंगुडी

(कुंभकोणम पासून १७ कि. मी. दूर कावेरी नदीच्या दक्षिण तीरावर)

महर्षी व्यास कृत गुरु ग्रहस्तोत्र

देवानां च ऋषिणां च गुरु कांचन संन्निभम ।
बुद्धिभूत त्रिलोकेशमगतंनमामि बृहस्पति॥

अर्थ - हे बृहस्पते, सुवर्णाप्रमाणे तळपत्या देव आणि ऋषी वृंदाच्या पुरोहित गुरुंना माझे नमन असो.

गुरु गायत्री

ओंम वृषभध्वजाय विद्महे गृणि-हस्ताय धीमहि तन्नो गुरुः प्रचोदयात ।

वाचस्पती किंवा बृहस्पती ग्रह प्रेमळ व दयावान मानला जातो. त्याचे अलंगुडी मंदिरात महत्वाचे स्थान आहे. (अलन म्हणजे हलन, विष, हल व गुडी म्हणजे धारण, प्राशन करणारा अशा या गावाच्या मंदिराच्या नावाची फोड करता आढळून येते.) देव आणि दानवांच्या प्रयत्नाने समुद्र मंथनातून निर्माण झालेल्या विषाचा परिणाम नष्ट करण्यासाठी भगवान शंकरांनी ते हलाहल पिऊन टाकले व त्या संकटातून पृथ्वीवरील मानवासह जीवसृष्टीला वाचवले. म्हणून या ठिकाणच्या शिवांच्या मूर्तीला (अबत - आफत), संकट, सहायर - मदत करणारा) असेही म्हटले जाते.

या स्थानाला गुरुक्षेत्र मानतात. पंचारण्यम या नावाने हा भाग पूर्वी प्रसिद्ध होता. हिरवीगार भात शेते. कमळाच्या, लिलीच्या फुलांनी बहरलेले तलाव. यामुळे या परिसरात प्रसन्न वातावरण आढळते.

पाच मजली नक्षीदार गोपुरम असलेले विस्तीर्ण आकाराच्या मंदीराला बाहेरील तटबंदी व खंदकाने आणखी बळकटी मिळते. हे मंदीर कमीतकमी १४०० वर्षे जुने असावे असे मानले जाते. मंदीर प्रदक्षिणा मार्गावर विनायक, सूर्य, शनिश्चर, नटराज, शुक्र, अगस्त्य व पार्वती अम्मन यांची उपमंदिरे आहेत. या ठिकाणी दीप लावून अर्चना करतात. कोणी आपल्या वयाच्या इतक्या तर कोणी २४ प्रदक्षिणेच्या रूपाने दीप लावतात. पिवळी वस्त्रे. मातीच्या पणत्या, त्यात तेलाची वात शिवाय काड्यांची पेटी साहित्य तत्परतेने मिळते. वातीला कापराच्या चुऱ्याचा थर लावला तर वात पटकन पेटते. त्यामुळे दीप लावण्यासाठी उत्साह वाटतो.

गुरु ग्रहाच्या मूर्तीच्या पूजा करताना अगस्त्य, विनायक आदि देवांच्या पूजेची सोय त्यातच होते. अगस्त्य महर्षींच्या बुटक्या व स्थूल पोटाच्या आकारावरून त्यांची मूर्ती पटकन ओळखता येते. चैत्र पौर्णिमा, पुष्य नक्षत्रावरील पौष व उत्तरा फाल्गुनी नक्षत्रावर फाल्गुनी नक्षत्रावर फाल्गुन महिन्यात मोठ्या उत्सव साजरा केला जातो.

**तिरुतेनकुडी** - तंजावर पासून पाच कि. मी. दूर येथील मंदिरात गुरुंची पूजा करतात. काळ्याकभिन्न दगडात बांधलेल्या मंदिराचे आकर्षण असे की तेथील चंद्रकांत नामक एक दगड वातावरणातील बाष्प शोषून तो ओला राहतो. येथील शिवाच्या मुर्तीच्या मस्तकावर या चंद्रकांत पाषाणातून, जलाभिषेक नैसर्गिकरित्या सदैव होत असतात. विस्तीर्ण जलाशयाजवळ, शिवाला स्वयमगंदेवर नावाने येथे पुजले जाते. सुंदर कुंडल अंबिकई या नावाने पार्वतीला सन्मान दिला जातो गुरु पेयारची या नावाचे गुरु ग्रहाचे एक प्रसिद्ध उपमंदिर आहे. विनायक. कार्तिकेय नटराज गजलक्ष्मी आदि मंदिरे याच मंदिर परिसरातील महत्वाची उपमंदिरे आहेत. तट्टई म्हणजे बेट, वन्नार व वेट्टारू नद्यांच्या मध्ये वसलेल्या रथपुरी उर्फ तेन्नू असे म्हणतात.

**नैवेद्य** - हरभऱ्याच्या भिजवून फुगवल्याला डाळीला फोडणी दिलेली वरची खोबऱ्याची पखरण.

आदेश देतात की या ठिकाणी विवाह संपन्न व्हावा या आकांक्षेने आलो आहोत. ती काममा पूर्ण व्हावी. झाली की परत-फेड म्हणून जोडीदारासह या मंदिरात पुन्हा जरूर येऊन व संकल्प पूर्ती करीन. मिळालेला हार विवाह होईपर्यंत जपून ठेवेन. विवाह चांगल्या प्रकारे व वेळ न जाता व्हावा ही प्रार्थना रोज करीन आदि संकल्प सोडून त्याप्रमाणे आचरण करण्याचे वचन घेऊन बाहेर यावे लागते. काही जोडप्यांशी संपर्क करता त्यांचे विवाह झटपट झाल्याचे व चांगला जोडीदार मिळाल्याचे सांगण्यात आले. सर्व कामाला एक तास लागतो. रोज ३-४ वेळा अशा पूजा होतात.

## ६) शुक्र स्थान - कंचनूर

(कुंभकोणम पासून १२ कि. मी. दूर)

**महर्षी व्यास कृत शुक्र ग्रहस्तोत्र**

हिमकुंद मृणालाभमदैत्यांनाम परम गुरुमं॥
सर्व शास्त्रप्रवक्तारम गभार्गवम प्रणमाम्यहम ॥

**अर्थ** - दैत्यांचे गुरु, सकल ज्ञान शास्त्रांचे ज्ञाते, भार्गव नामे कमलनयनी, हिमकुंदप्रमाणे सौंदर्यवान शुक्राला माझे नमन असो.

**शुक्र गायत्री**

ओम अश्वध्वजाय विद्महे धनुर्हस्ताय धीमहि ।
तन्नो शुक्रः प्रचोदयात ।

**मंदिर कथा** - कांचनार या शिवभक्ताला उशीरा कन्यारत्न प्राप्त झाले. परवई वयात आली व चौल घराण्यातील सरदार काली कमर याच्याशी विवाह ठरला. दक्षिण भारतात आपली प्रियवस्तू देवाला वाहण्याची प्रथा आहे. म्हणून स्त्रिया आपले लांब सडक केस देवाला वाहतात. एरव्ही उत्तर भारतात केशवपन करणे अशुभ मानतात तर दक्षिणेत बलिदानाचे प्रतीक. ऐन लग्नाच्या धामधुमीत केशदान केल्याने विना केश वधू फारच वाईट दिसेल या चिंतेत तिचा पिता असताना, उमा-महेशांनी त्याच्या भक्तीवर प्रसन्न होऊन परवई कन्येला केश प्रदान केले व वेळ तारली. या शिवाय अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. मथुरेच्या राजा कंसाला आजारात उतार पडण्यासाठी पलास (पळस) वृक्षाच्या अग्निश्वराची पूजा करायला सांगितली. त्या नंतर त्याला उत्तम आरोग्य प्राप्त झाले.

**मंदिर** - अग्निश्वर व कर्पग अंबिगई (पार्वती) यांचे प्रमुख मंदीर अत्यंत भव्य आहे. त्यावर सुंदर मूर्ती व चित्रे असून त्यावरून प्राचीन कल्पकतेची साक्ष पटते. मंदिराचे आणखी वैशिष्ठ्य असे की शिवासमोरील नंदी हिरवा चारा खात आहे. अन्य ठिकाणी नंदी जीभ बाहेर काढून बसलेला असतो.

**नैवेद्यम** - मोच्छई परप्पु सादमग

मुगाची डाळ रात्रभर भिजवून ठेऊन तिला फोडणी केलेला पदार्थ. त्यात भात न घालता बनवल्याने त्याला तिखट व चमचमीत चव येते.

---

**(२) आयुष्य होमाची सांगता- तिरु कडायूरचे शिव मंदिर**

केस आय सी यू मधील. शेवटच्या दर्शनाला नातेवाईकांना बोलावणी गेलेली, वैद्यक उपाय संपले यापुढे ईश्वरेच्छा असे डॉक्टरांचे मत. अशा परिस्थितीत आयुष्य होम कर केस वाचेल असे महर्षी सांगतात. तेव्हा चमत्कारी फरक जाणवतो. केस वाचतो. अशा या चमत्कारी होम करण्याचे ठिकाण म्हणजे तिरुकडायूरचे शिव मंदिर. येथील आयुष्य होम केलेल्यांचे संकल्प अल्पावधीत फलित होतात असा अनेकांचा अनुभव आहे. उपाय दूरस्थ व खर्चिक असला तरी हटकून फलदायी आहे.

षष्ठयब्दी पूर्तीच्या आनंद सोहळ्याचे मंदिर येथेच आहे. या ठिकाणी जोडप्यांपैकी पतीच्या ६१ व्या वाढदिवसाला येथे येऊन विवाहाचा सोहळा पुन्हा त्याच पत्नीशी करण्याचा विधी केला जातो. अघोर मूर्तीचे भीषण रौद्र सौंदर्यही याच ठिकाणी पाहायला मिळते.

(हॉटेल सदाभिषेकम् - ०४३६४-२८७४१३, २८७६१३, २८७७१३.)

**कालसंहारमूर्ती** - शिवांनी मार्कंडेयांचे प्राण वाचवण्यासाठी यमधर्म काळाचा संहार केला म्हणून त्याचे नाव 'महाकाळ' असे पडले हे या मूर्तीतून कळत होते. याशिवाय पार्वतीचेही एक भव्य मंदिर प्रांगणांत आहे. या मंदिराच्या गर्भगृहाबाहेर २ स्त्री अंगरक्षक एका बोट वर करून 'नको/नाही' असे दर्शवते. या गाभाऱ्यात प्रवेश करताना मनातील अन्य विचार, चिंता, कष्ट, समस्यांना बाहेर ठेवून श्रद्धायुक्त अंतःकरणाने आत या. मग तुमचे कल्याण झाल्याशिवाय विन्मुख जाणे घडणार नाही असा संदेश या मूर्तीचा आहे.

## ७) शनि स्थान - तिरुनल्लार

(कुंभकोणम पासून ५० कि. मी. दूर नल्लार नदीच्या तीरावर)

**महर्षी व्यास कृत शनि ग्रहस्तोत्र**

नीलांजन समाभासम रविपुत्रम यमाग्रजम ।
छाया मार्तंड संभूतम तम नमामी शनैश्चरम ॥

**अर्थ - सुर्यपुत्र, यमराजाचा बंधु, छायेचा पती असलेल्या, नीलकांतीच्या शनी देवाला माझा नमस्कार असो.**

**शनैश्चर गायत्री**

ओंम काक ध्वजाय विद्महे खड्ग हस्ताय धीमहि
तन्नो मंद: प्रचोदयात ।

**मंदिर रचना -** हे स्थान पूर्वीच्या फ्रेंच वसाहतीच्या कराईकल प्रदेशात येत असल्याने आजही स्वच्छता व टापटीप लक्षात येते. मंदिराच्या बाह्य सजावटीवरून हे मंदीर अकराव्या शतकातील चोल घराण्यातील असावे असा अंदाज केला जातो. मंदिराचे गोपूर पाच मजली आहे. शनिमंदिरातील मूर्तीमागे सोन्याच्या कावळ्याची मूर्ती आहे. दर्भ ही वनस्पती या मंदिरातील शनिची आवडती वनस्पती आहे. ती अर्पण केल्याने शनिपीडा कमी होतात किंवा नष्ट होतात. शनिला संध्याकाळी तेलाचा दिवा लावून पुढे जायचे असते. अल्पमृत्यू न घडावा या साठी शनीच्या आशीर्वादाने दीर्घायुष्य मिळते. शनीच्या कृपेने आश्चर्यकारक शुभ फळे मिळतात. खजिन्याचा लाभ होतो.

शनिदेवाकडे दुर्दैवी व अघटित घटनांच्यामुळे एक कुप्रभावी ग्रह म्हणून पाहिले जाते. शनीच्या साडेसातीचा काळ प्रसिद्ध आहेच. या ठिकाण ब्रह्म तीर्थ सरस्वती तीर्थ, अगस्त्यतीर्थ, हंस तीर्थ व नल तीर्थ अशा नावाचे जलाशय आहेत. ब्रह्म तीर्थावर नेसती वस्त्रे पाण्यात दान करून नव चैतन्यशक्तीचा प्रभाव होतो असे जाणवते. ब्रह्म तीर्थाजवळ विनायक मंदिराच्या प्रवेशापाशी एका भिंतीवर शेंडीवाल्या नारळाला जोरात फेकून तो फोडून अर्पण करण्याची प्रथा आहे. नल दमयंती आख्यानात शनीदेवाला योग्य तो सन्मान न मिळाल्याने त्याच्या कोपाने नलाला झालेली कष्टमय परिस्थिती सुप्रसिद्ध आहे.

**येथील शिवलिंग स्वयंभू आहे. या मंदिरात दीप लावण्याची प्रथा आहे. येथे गरिबांना अन्नदान, वस्त्रदान करण्याची प्रथा आहे. येथील आणखी एक वैशिष्ट्य असे की शनिदेवाखेरीज या स्थानी अन्य कोणतीही उपमंदिरे नाहीत.**

**तिरुवलंचूली - शनिदेवाचे हे स्थान तिरुनल्लार पेक्षा कमी प्रसिद्ध आहे. तरी हे स्थान शनिदेवाचे जागृत स्थान मानतात. कुंभकोणम पासून पाच कि. मी. दूर स्वामी मलई पासून एक कि.मी.वर या मंदिरात भैरव रूपातील शिव कुत्र्यावर आरूढ आहेत. कावेरी नदीत स्नान करून दर्शन घेतल्याने यश मिळते असे मानतात.**

**नैवेद्यम - ईल शागम**

**तिळाला सोनेरी रंग येईपर्यंत परतून, तुपाची फोडणी देऊन तयार भातावर आमटीप्रमाणे घालून कालवलेला भात.**

---

**(३) सरस्वती देवीच्या मंदिरात लेखन सामुग्रीचे दान पुण्य**

मुलांच्या विद्या-अभ्यासामधील समाधान कारक प्रगतीसाठी या मंदिरात जायला सुचवले जाते. कुत्रानूर या गावातील हे मंदिर आहे तसे लहान. पण त्याची ख्याती दूरवर पसरली आहे. मंदिरात दसऱ्याच्या निमित्ताने विविध नृत्य-गायन कलाकारांचा कार्यक्रम पाहायला मिळतो. मंदिराच्या बाहेर दुकानातून पुस्तके, वह्या, पेन-पेन्सिली गरजूंना दान करण्याची आगळी प्रथा आहे. या ठिकाणी दर्शनासाठी छोट्या पणत्यातून तेल किंवा तूप भरून, वाती-काड्यापेटी ट्रे मध्ये तयार मिळतात. मंदिरातील मुख्य मूर्तींच्यासाठी मनात आराधना करून दिवे लावताना सात्विक आनंद मिळतो.

## ८) राहू स्थान-तिरु नागेश्वरम

(कुंभकोणम पासून ५ कि. मी. दूर)

महर्षी व्यास कृत राहू ग्रहस्तोत्र

अर्धकायं महावीर्यम चंद्रादित्य विमर्दनम॥
सिंहिका गर्भ संभूतम तं राहूम प्रणमाम्यहम

अर्थ - सींहिकेच्या गर्भात जन्म पावलेल्या, अर्धमानव रूप धारण केलेल्या, चंद्र आणि सूर्याचा तीव्र पराभव करणाऱ्या अति बलाढ्य राहूला माझे वंदन असो.

राहू गायत्री -

ओम नाग ध्वजाय विद्महे पद्महस्ताय धीमहि

तन्नो राहुः प्रचोदयात ॥

मंदिर इतिहास - कुंभकोणम पासून पाच कि.मी. दूर तिरुनागेश्वरम मंदीर तमिळनाडू राज्यातील शिवमंदिरांपैकी एक अतिभव्य मंदीर आहे. पंधरा एकर जागेतील या प्रचंड मंदिराचा इतिहास कमीतकमी पंधराशे वर्षे जुना आहे. चोल राज्यांच्या कारकीर्दीत निर्माण झालेल्या या मंदिराच्या नैऋत्य कोपऱ्यात राहू देवाची मूर्ती आहे. मंदिराच्या चारी बाजूंनी प्रचंड तटबंदी आहे. अनेक उपमंदिरे, मंडप यांनी सर्व परिसर गजबजलेला असतो. १०० खांबी रथावर मंडप ध्वजस्तंभ, बलिपीठम, प्रचंड मोठे शूल तीर्थ नावाचा तलाव आहे.

तेथे राहू नाग रूपात पत्नी सींही व चित्रलेखा यांच्या सह स्थापला आहे. प्रथम पत्नीचे निधन झाले असेल तर दुसऱ्या पत्नीच्या दीर्घायुष्या-साठी राहू दोष निवारण्यासाठी येथे प्रार्थना-अर्चना करावी.

**राहू काल** - दिवसातील दीडतास हा राहू काल मानला जातो. त्या काळात मंगलकार्ये, प्रवास खरेदी किंवा महत्वाची कामे टाळली जातात. रविवारी राहू कालात राहूची विशेष पूजा त्या मंदिरातील मोठ्या सभामंडपात केली जाते. त्यावेळी दुधाचा अभिषेक मूर्तीला करताना ते दूध निळसर रंगाचे भासते. रविवारच्या पूजेत दुधाच्या अभिषेकाची व अर्चनेची सोय असते. त्या ठिकाणी प्रत्यक्ष जाता येत नसेल तर पैसे पाठवून पूजेचा प्रसाद पोस्टाने मिळवता येतो. येथे रोज शेकड्यांच्या संख्येने राहू पूजा दिवसातून तीन वेळा चालते.

महर्षी भृगुंनी या मंदिर परिसरात प्राचीन काळी तपश्चर्या केली होती. येथे शिवांच्या शिवाय संत सुंदरर व त्यांची पत्नी परवाई यांच्या मूर्ती आहेत. येथील हातमागावर बनवलेली रंगीत बारीक काठाची पांढरी शुभ्र धोतरे प्रसिद्ध आहेत. चाफ्याची फुले येथे विशेष महत्वाची मानतात.

**नैवेद्यम** - उत्तलम परुप्पु सादम

उडीद डाळ तावून तळून त्यावर फोडणी देऊन त्याची भातावर पेरणी केलेला मसाले भात.

---

**नवग्रह यात्रेची आखणी अशी करता येईल-**

**रेल्वेची सोय** - मुंबईहून पुणे-सोलापूर करत तीन गाड्या जातात. शिवाय तिरुपतीवरुन कांचीपुरम, विलुपुरम करत त्रिची, मदुराई अशी नागरकोईल एक्सप्रेसही उपयुक्त.

**टॅक्सी-बसची सोय** - चेन्नई सेंट्रल बस टर्मिनस रेल्वेस्टेशन पासून ७ कि. मी. दूर आहे. तेथे रिक्षाने जावे लागते. तेथून मैलाडुदुराई बसने वैदीश्वरन कोईलला उतरावे. तेथून टॅक्सीने नवग्रहमंदिरे करावी. शक्यतो मोडके तोडके इंग्रजी येणारा ड्रायव्हर पकडावा. राहू, मंगळ, शनी, गुरु, मंदिरात भली मोठी रांग असते. सूर्य मंदिरात दोन तासाच्यावर वेळ लागतो. चंद्राचे मंदीर दुपारी चार तास बंद असते. पाँडेचरी, चिदंबरम, कुंभकोणम, तिरुवन्नमलाई, तंजावूरसाठी बसेस सोईच्या आहेत.

**हॉटेलची सोय** - नॉनएसी लॉज डबलबेडसाठी ३०० रुप्या पुढे, एसी ८००-१००० रु. च्यापुढे. वैदीश्वरन कोईलमध्ये सदाभिषेकम (०४३६४-२७९२२३) व शुभम चांगल्या दर्जाची हॉटेल्स आहेत. जेवणात भरपूर भात-रसम सांभार खाण्याची तयारी ठेवावी. यात्रेचा सर्व खर्च दिवसाला माणसी १५०० रुपये धरावा. नवग्रह यात्रेला तीन दिवस पुरेसे.

## ९)केतु स्थान-कील पेरुम पल्लम

(१)कुंभकोणम पासून ६५ कि. मी. दूर बनात शिवाय

(२) कालहस्ती मंदीर रेणीगुंठा स्टेशनापासून २५ किमी वर

(३) शिवम जियम कुंभकोणम पाशी

**महर्षी व्यास कृत केतू ग्रहस्तोत्र**

पलाशपुष्प संकाशमकारकाग्रह मस्तकम।
रौद्रम रौद्रात्मकम घोरम तं केतुं प्रणमाम्यहम ॥

**अर्थ-पलाशपळसाच्या फुलासारखा रक्त वर्णाचा, तारका ग्रहाचे मस्तक असलेला, रौद्र अविर्भावातील हे केतु तुला माझे नमन असो.**

**केतू गायत्री -**

ओंम अश्वध्वजाय विद्महे शूलहस्ताय धीमहि तन्नो केतुः प्रचोदयात ॥

स्थान महिमा - केतु व राहू हे चंद्र सूर्याच्या कक्षांचे छेदन बिंदू असून पत्रिकेत एकमेकांच्या समोर दिसतात. पौराणिक कथेप्रमाणे सागरमंथानातून निर्माण झालेल्या अमृताचा एक घोट केतूच्या मुखात गेला पण ते त्याच्या पोटात न पोचल्याने शिरच्छेद केल्याने केतूला पंचमुखी सर्पाचे शीर्ष लावलेले दिसते. केतूसाठी काळ्या कपड्यांचा धारक रथ मातलीने अर्पण केला त्याच्या रथाला १० घोडे आहेत. एका हातात गदा व दुसरा हात वर देणारा. चांदीचा पत्रा असलेला सर्पराज असे यामूर्तीचे वर्णन केले जाते.

केतूमंदिरांना भेट अशासाठी देतात की ज्यांच्या पत्रिकेत शुक्र शुभ स्थानात असेल तर या मंदिरात अर्चना केली तर ती व्यक्ती आकस्मात मालामाल होण्याची शक्यता असते.

**कालहस्ती - हे नाडी पट्ट्यातून वर्णन केलेले केतूचे प्रख्यात स्थान आहे. एक अति भव्य व विस्तीर्ण मंदिर तिरुपतीच्या वाटेवर रेणीगंठ्यापासून २५ किमी दूर आहे. इथे कार्तिक महिना व जेष्ठ महत्वाचा असतो. त्या महिन्यात रविवारी केतूची पीडा असणाऱ्यांना या मंदिरातून पूजा करणे गरजेचे आहे.**

**शिवम जियम - या कुंभकोणम जवळील या मंदिराचे स्थान भव्य व दणदणीत आहे. या मंदिरात केतू शिवाय शनी. राहूचे स्थानही आहे. चंदनाचा वृक्ष पवित्र मानतात. सर्पदोष असेल तर येथे शांती करावी.**

**नैवेद्यम - कोल्लु पोळी सादम**

**हरभऱ्याच्या डाळीला रात्रभर भिजवून फुगवल्यावर त्यात तयार भात मिसळून फोडणी दिलेला, तिखट भात.**

### मंदिरात पूजा-अर्चना, जप साधना केल्याने, दीप लावल्याने फळ मिळते याचे वैज्ञानिक स्पष्टीकरण काय ?

नवग्रहांच्या मंदिरांना भेट देऊन त्यांची पूजा-अर्चना करून हिंमतीने लढा देणाचे, संधीचे सोने करण्याचे, निश्चय करणे अपेक्षित आहे. भक्तांची मनस्थिती उच्च विचारांची, संकल्प, निश्चय करण्याची होण्यासाठी मंदीर प्रांगणातील स्थापत्याचा आस्वाद घेणे, चित्रे, मूर्ती यामधून इतिहासाची कल्पना करणे, दीप लावून काळाच्या अंधारात दडलेला मार्ग शोधणे, प्रदक्षिणेच्या फेऱ्या मारताना मनात स्तोत्रे, काव्य, जप-साधना करून आपली मनस्थिती सकारात्मक व निश्चयी करण्याचे काम होते. त्या वेळी मंदिरातील वातावरणात सत्प्रवृत्तींच्या लहरींना, अनुकंपनांना, आकर्षित करण्याचे सामर्थ्य येते. असे प्रत्येक भाविकाच्या सतप्रवृत्तींचे प्रक्षेपण परस्पर घडते. मंदिराच्या आसमंतातील धीरगंभीर शांतता आल्हाददायक वाटते ती याच कारणाने. आसपासची अस्वच्छता गोंगाट, कोंदटपणा आदी गोष्टी अशा वेळी गौण करून मनाची सकारात्मक स्थिती जो ठेवतो. सहानुभूतीयुक्त स्पंदने, अनुकंपने जो निर्माण करतो त्यालाच देव पावतो.

गर्भ जसा मातेच्या गर्भाशयाशी नाळेने जोडलेला असल्याने त्या गर्भाची व धारण करणाऱ्या, पोषण करणाऱ्या मातेची इच्छा एकच बनते. (त्यालाच डोहाळे म्हणतात) त्याचप्रमाणे मानव ईश्वररूपी मातेच्या विश्वरूप शरीराला श्रद्धेच्या, भक्तीच्या नाळेने जोडला गेला तर त्याची इच्छा व ईश्वराची इच्छा सहानुभूतीयुक्त अनुकंपनाच्या (Sympathetic Vicrations) नियमानुसार एकच बनते व तो ईश्वर श्रद्धा युक्त मानवाची इच्छा पूर्ण करतो. प्रार्थनेचे फळ का मिळते, नवसाला देव का पावतो, घोडचुकाला खऱ्या श्रद्धेने, भक्ती केलेली कोणतीही कृती फलद्रूप का होते याची शास्त्रीय उपपत्ती कॅमरर, युंग, पॉप आदी पाश्चात्य शास्त्रज्ञांनी शोधलेल्या अनुक्रमे क्रमबद्धतेच्या (seriality) व अर्थपूर्ण घटनात्मकतेच्या (synchronicity) ईश्वर निर्मित विश्वाच्या अंगभूत गुणधर्मामुळे सफल होते. हे आता विज्ञानानेही मान्य केले आहे. (संदर्भ - विज्ञान आणि चमत्कार - लेखक - प्राचार्य अद्वयानंद गळतगे)

प्रकरण ४

# हा घ्या चमत्काराचा पुरावा !

'चमत्कार' झाला असे नुसते म्हणण्याला काही अर्थ नसतो. कारण अशा घटना वाचनात किंवा ऐकिवात आल्या तरी त्यामुळे संतुष्टी होत नाही. त्या 'चमत्कार' घटनेचा तत्काळ पुरावा मिळवून त्याची सत्यता तपासल्यावर ती चमत्काराची घटना मान्य केली जाते. नाडी भविष्याच्या पट्ट्यात व्यक्तीच्या संदर्भातील नावे कूट तमिळमध्ये कोरून लिहिलेली असतात याचा पुरावा सादर केला जाणे अत्यंत महत्त्वाचे आहे. त्या दिलेल्या पुराव्याची शहानिशा करून ती लिपी किंवा कोरून काढलेली नावे खोटी आहेत हे सिद्ध करण्याची जबाबदारी नाडी भविष्याला नावे ठेवणाऱ्यांसाठी जीवन-मरणाचा प्रश्न बनायला हवी.

सामान्य मराठी वाचकाला तमिळ-भाषा व पट्टीतील कूट लिपी याचा गंध नसल्याने 'खरेच काय आहे कोणास ठाऊक' असे वाटू लागते. त्या सर्वांच्या समाधानासाठी सोबतच्या दोन चौकटींकडे शोधक नजरेने पाहणे आवश्यक आहे. शिवाय पुस्तकाच्या मलपृष्ठावर वेगवेगळ्या दोन पट्ट्यांमध्ये 'शशिकांत' नाव कोरलेले दाखवणारे रंगीत फोटो प्रथमच प्रकाशित होत आहेत. त्यावरून व तमिळ लिपी प्रिंटच्याप्रमाणे प्रत्येक अक्षर कसे असते व तेच अक्षर पट्टीत कसे दिसते याचे प्रत्यक्ष प्रमाण सादर केले आहे. शोधक वृत्तीच्या वाचकांनी तमिळ अक्षर व पट्टीतील कूट लिपीतील लपेटी व हस्ताक्षराच्या स्वातंत्र्यामुळे झालेल्या लेखनाचा विचार करून शशिकांत हे नाव दोनही पट्ट्यात कसे काढले गेले आहे याचा अत्यंत बारकाईने अभ्यास करावा आणि व्यक्तीचे नाव नाडी पट्टीत कोरून येते किंवा नाही हे ठरवावे !

पुण्यात झालेल्या अधिवेशनात प्रत्येकाने आपल्या पट्टीतील संबंधितांची नावे कुठे लिहिलेली आहेत. याची सत्यता नाडी वाचकाकडून पडताळून घ्यावी, असे आवाहन केले गेले.

## हा घ्या चमत्काराचा पुरावा !

सोबतच्या नाडीपट्ट्यांच्या व मलपृष्ठावरील दोन्ही फोटोंमध्ये 'शशिकांत' हे नाव पहिल्या ओळीतील दोन टिंबांच्या मधे कुठे व कसे कोरून काढलेले आहे याचे तमिळ भाषा न जाणणाऱ्या वाचकांसाठी दिलेले स्पष्टीकरण :-

| देवनागरी लिपी | ENGLISH | तमिल लिपी | कूट तमिल लिपी |
|---|---|---|---|
| श | SHA | ச | |
| शि | SHI | சி | |
| का | KA | கா | |
| (अनुस्वार) . | N | ந் | |
| त | THA | த | |

# नाडी ग्रंथ भविष्य-आकाश लेखनाचा निर्णायक पुरावा

## (प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांच्या 'विज्ञान आणि चमत्कार' ग्रंथातील काही महत्वाचा भाग)

आपल्या प्राचीन ऋषी-मुनींना ही आत्मलोकाची अतींद्रिय दृष्टी प्राप्त झाली होती याची साक्ष भृगुसंहिता व नाडीग्रंथ आजही देतात. ही केवळ कल्पना नाही. प्रस्तुत लेखक स्वत: त्यांचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन व त्यातील विधाने पडताळून पाहून हे म्हणत आहे. भृगुसंहितेचा अनुभव लेखकाने काशीत (वाराणसीत) जाऊन व अगस्त्य नाडीग्रंथाचा पडताळा मद्रास (चेन्नई) येथे जाऊन प्रत्यक्ष पाहिला आहे. वाराणसीत दुसऱ्या एका व्यक्तीच्या बहिणीची कुंडली पं. भगवानदास चुन्नीलाल (दशाश्वमेध) यांना दाखवून हा पडताळा पाहिला आहे व चेन्नई येथे स्वत:च्या आंगठ्याचा ठसा देऊन तो पाहिला आहे. येथे चेन्नई येथील नाडी-ग्रंथाचा अनुभव थोडक्यात कथन करतो:

प्रस्तुत लेखकाने १६ डिसेंबर १९९८ रोजी दुपारी १२॥ वाजता मद्रासच्या तांबरम् येथील नाडीकेंद्रात आपल्या आंगठ्याचा ठसा दिला. तो घेऊन नाडीवाचक निघून गेला व सुमारे एक तासाने लेखकाच्या आंगठ्याच्या ठशाशी जुळणारे व भूर्जपत्रावर अक्षरे कोरलेले अनेक ग्रंथ घेऊन आला. त्याने लेखकापुढे एकएक ग्रंथ घेऊन वाचण्यास सुरुवात केली. त्यापैकी लेखकाच्या जीवनातील घटनाशी न जुळणारे काही ग्रंथ होते. ते बाजूला ठेवण्यात आले. शेवटी एका ग्रंथातील घटना लेखकाच्या जीवनातील घटनांशी बऱ्याच जुळून आल्यामुळे (उदा. लेखकाला एकच बहीण आहे, तिच्या सासरच्या लोकांशी लेखकाचे पटत नाही. इ.) तो लेखकाचा ग्रंथ आहे, असे वाटून शेवटी नावावरून पूर्ण खात्री होत असल्यामुळे (ग्रंथाची खात्री पटेपर्यंत नांव सांगितले जात नाही; आपण तर काहीच बोलायचे नसते. नुसते विचारलेल्या प्रश्नाला 'हो' किंवा 'नाही' एवढेच उत्तर द्यायचे असते) नाडीवाचकाने लेखकाला "तुमच्या नांवाचे पहिले अक्षर 'अ' व तिसरे अक्षर 'या' आहे काय ?" असे विचारले. लेखकाने 'हो' म्हणताच तो ग्रंथ लेखकाचा असल्याचे सिद्ध झाले व त्याने तो ग्रंथ संपूर्ण वाचून दाखवला; आणि आश्चर्य असे की तो संपूर्ण ग्रंथ लेखकाच्या जीवनाशी तंतोतंत जुळणारा होता. त्यामध्ये लेखकाच्या नावाबरोबरच त्याच्या आईचे, वडीलांचे व पत्नीचेही नांव होते. इतकेच नव्हे तर लेखकाची जन्मवेळ व त्या वेळची आकाशातील ग्रहस्थिती बरोबर सांगितलेली होती. हा एकट्या लेखकाचा अनुभव नाही भारतातील व परदेशातील असंख्य लोकांचा अनुभव आहे. तेथे मलेशिया व जपान येथूनही बरेच लोक आले होते. लेखक काही मलेशियनांना भेटला. व माहिती घेतली. काही जपानी स्त्रियांची मुलाखतही घेतली. त्यांनी आपले नांव व इतर खासगी माहिती नाडीत बरोबर आल्याचे सांगितले. योशिको ओटा या ७० वर्षाच्या जपानी स्त्रीचा मागचा जन्म तंजावर मध्ये झाल्याचा व पुढील जन्म पुट्टपर्तीमध्ये होणार असल्याचा तिच्या नाडीत उल्लेख होता.

जीवनातील प्रमुख घटनाच नव्हे, तर इतरही अनेक किरकोळ गोष्टीही अगस्त्य ऋषींना अगोदरच घडणार असल्याचे माहीत झाले होते, असे दिसून आले. उदा. लेखकाला त्याच्या नाडीग्रंथात वाचून सांगण्यात आले की तो त्याच्या ६७ व्या वर्षी हे नाडीभविष्य पाहताना उपस्थित आहे. (पुण्याचे विंगकमांडर शशिकांत ओक हे त्यावेळी लेखकाबरोबर होते.) तसेच लेखकाचा नाडीग्रंथ पाहण्याचा हेतू आपले भविष्य जाणून घेणे हा नसून शास्त्रीय संशोधन करणे हा आहे, असे सांगण्यात आले. (हेही बरोबर होते. म्हणजे व्यक्तीच्या मनातील हेतूही वा

विचारही ते ओळखत होते.

श्री. ओक व प्रस्तुत लेखक यांनी आपले नांव तमिळ लिपीत नाडीपट्टीत कोरले गेले असल्याची खात्री करून घेतली आहे. श्री. ओक ओव्हरहेड प्रोजेक्टरच्या साह्याने तामिळ लिपीत नाडीपट्टीत आपले 'शशिकांत' हे नांव कसे वाचता येते याचे जाहीर प्रात्यक्षिकही करून दाखवतात. ('शशिकांत' हे नांव तामिळ लिपीत कसे वाचता येते याच्या माहितीसाठी पाहा, 'चमत्कारांच्या पुढचा' या पृष्ठ १८ वरील तक्ता व नाडीपट्टीचा 'शशिकांत' नांव असलेल्या पट्टीवरील फोटो.)

सूक्ष्म पातळीवर सर्व घटना स्थिरस्वरूपात एकावच्छेदेकरून पाहता येतात. कालाचा अनुभव तेथे येत नाही. तो अनुभव फक्त स्थूल (भौतिक) पातळीवरच येतो. हे समजण्यासाठी ऑलिव्हर लॉज या भौतशास्त्रज्ञाने आगगाडीचा दृष्टांत दिला आहे. आगगाडीतून प्रवास करताना आपल्याला बाहेरचे जग (झाडे इ.) धावत असल्याचे दिसते व आपण स्थिर आहोत असे वाटते. वास्तविक आपणच धावत असतो व बाहेरचे जग स्थिर असते. तसे सूक्ष्म पातळीवरील जग (घटना) स्थिर असताना स्थूल पातळीवरील आपल्याला ते जग धावत असलेले दिसते. घटना घडत असलेल्या दिसतात. म्हणूनच कालाचा अनुभव येतो. वस्तुतः घटना घडत नसतात. आपणच घटनांना जाऊन भेटत असतो. हालचाल आपली असते. घटनांची नसते. आगगाडीत बसल्यानंतर काही वेळाने स्टेशन 'येते' आणि आपण 'स्टेशन आले' असे म्हणतो. पण वस्तुतः स्टेशन कधीच 'येत' नाही. ते आहे तेथेच असते. आपणच स्टेशनला जाऊन भेटतो. 'स्टेशन' ही भविष्यातील (किंवा कालातील) घटना समजली तर विश्व हे अगोदरच घडलेले नाटक कसे आहे, म्हणजे ते अगोदरच कसे घडलेले आहे व आपणच आपल्यावरील 'माये'मुळे (दृष्टिभ्रमामुळे) ते घडत असल्याचा (म्हणजे कालाचा) अनुभव घेतो, हे लक्षात येईल. स्थूल जगातील कालानुभव हा आपल्यावरील 'माये'चा प्रभाव असून तो प्रभाव गीतेत कृष्णाने म्हटल्याप्रमाणे माणसावर जबरदस्त असल्यामुळे ('मम माया दुरत्यया') विश्व हे अगोदरच घडलेले नाटक आहे व ते आपण स्थूल जगात राहून घडत असल्याचा (कालाचा) अनुभव (आपल्याच भ्रमाने) घेत असतो, हे सत्य स्वीकारायला माणसाला जड जाते.

वास्तविक काल अस्तित्वात नाही आणि घटना 'घडत' नाहीत. तीन मितींच्या जगात शंकूच्या रुपाने दोन मितींच्या जगातील कालानुसार घडणाऱ्या 'घटना' एकदमच अस्तित्वात आहेत, हे सत्य तीन मितीमुळे आपल्याला कळते. चार मितींच्या अतींद्रिय दृष्टीच्या लोकांना विश्वरुपी नाटक अगोदरच 'आकाशलेखना'च्या रुपाने संपूर्ण अस्तित्वात आहे, ते 'घडत' नाही हे असेच कळते-जे तीन मितींचे आम्ही ते कालानुसार 'घडत' असल्याचा अनुभव घेतो.

भौतिक विज्ञानाच्या गृहीत-कृत्यानुसार (tenets of physical science) न घडलेल्या घटनांचे मानवी मेंदूला ज्ञान होणेच शक्य नसल्यामुळे भृगुसंहिता व नाडीग्रंथ हे 'अद्भूत चमत्कार' ठरतात यात संशय नाही. हे ग्रंथ अशारीतीने भौतविज्ञानाची सर्व गृहीतकृत्ये चुकीची किंवा खोटी ठरवतात. याचा अर्थ भौतवैज्ञानिकांनी शोधलेले भौतिक नियम व इतर शोध खोटे आहेत असा मुळीच नाही. भौतिक विज्ञानाला कडक मर्यादा आहेत एवढाच याचा अर्थ आहे. त्या विशिष्ट मर्यादेतच त्या विज्ञानाचे कार्य चालते. त्याच्या पलीकडे जाऊन (अभौतिक वा अतींद्रिय-क्षेत्रात) भौतशास्त्रज्ञांनी आपली गृहीतकृत्ये लागू करून निष्कर्ष काढले तर त्यांना नामुष्की पत्करावी लागते, हे या (त्यांच्या गृहीतकृत्यात न बसणाऱ्या) घटना दाखवून देतात. भौतशास्त्राच्या मर्यादेच्या बाहेर अध्यात्मशास्त्राचा अमल सुरु होतो. या अध्यात्मशास्त्राच्या कक्षेतील घटना ह्या 'चमत्कार' नसून नियमानुसार घडणाऱ्या घटनाच असतात. हे नियम म्हणजे कर्माचे नियम आहेत आणि ते सर्वश्रेष्ठ अतींद्रिय शक्तीच्या- 'ईश्वर' नामक 'कर्माध्यक्षा'च्या अधिपत्या-खालच्या कर्मदेवताकडून अमलात आणले जातात. ते नियम लिखित आणि चित्रित घटनांच्या रुपाने 'आकाश'रुपी कॅनव्हासवर अगोदरच त्यांनी नोंदविले असल्याचे मागे ब्लॅव्हेट्स्की यांच्या ग्रंथातील उतारे देऊन सांगितलेच आहे. त्याचाच भृगुसंहिता

व नाडीग्रंथ हा साक्षात पुरावा आहे.

आपल्या अपत्यांची नांवे ठेवण्यास आपण स्वतंत्र्य आहोत असे आपण समजतो. उदा. प्रस्तुत लेखकाचे वडील संतसाहित्याचे अभ्यासक होते. त्यातही ज्ञानेश्वरी त्यांना जास्त आवडे. म्हणून त्यांनी आपल्या मुलाचे (प्रस्तुत लेखकाचे) नांव 'अद्वयानंद' असे ठेवले.

विंग कमांडर ओक हे फुटबॉलचे चाहते आहेत. 'चिन्मय' हे एका फुटबॉलपटूचे नांव आहे. ते त्यांना आवडल्याने त्यांनी आपल्या मुलाचे नांव 'चिन्मय' असे ठेवले. प्रस्तुत लेखकाने त्याच्या मुलाचे नाव 'वेदांत' असे ठेवले. ही सर्व नांवे नाडीपट्टीत बरोबर आली आहेत. याचा अर्थ असा की लेखकाचे वडील, ओक व स्वत: लेखक हे आपल्या मुलांची नांवे काय ठेवणार आहेत हे त्यांनी ती नांवे ठेवण्यापूर्वीच ठरून गेले आहे ! अन्यथा अगस्त्य ऋषींना हजारो वर्षांपूर्वी (निदान नाडी लेखकाला शेकडो वर्षांपूर्वी) कसे माहीत झाले या प्रश्नाचे उत्तर दिले पाहिजे. ती नांवे 'आकाश' रुपी कॅनव्हासवर अगोदरच ठरवून लिहिलेल्या नाटकाच्या कथानकाचा तो भाग आहे, असे म्हणावे लागते. याचा अर्थ त्या आवडीनिवडी त्या व्यक्तींच्या नाहीत असा नसून त्यांच्या त्या आवडीनिवडीसुद्धा अगोदरच ठरून गेल्या आहेत असा आहे. नाटककार आपल्या नाटकातील पात्रांची नांवे, त्यांचा स्वभाव, त्यांच्या आवडीनिवडी, त्याच्या जीवनातील घटना इ. सर्व अगोदरच ठरवून नाटक लिहितो, तसे हे विश्वरुपी नाटक ईश्वराने (अर्थात् त्याच्या हाताखालच्या कर्मदेवांनी) अगोदरच ठरवून लिहून ठेवले आहे, असा याचा अर्थ आहे.

भृगुसंहिता व नाडी ग्रंथांचा संशोधक कसा नसावा याचे 'आत्मानंद' हे एक उत्कृष्ट उदाहरण आहेत. असे म्हणण्याचे कारण आपण नाडीचा अगर भृगुसंहितेचा कोणता अनुभव घेतला हे कोठेही न सांगता आपण संशोधक असल्याचा त्यांनी आपल्या संपूर्ण पुस्तकात फार मोठा आव आणला आहे. संशोधकाने आपला अनुभव गुप्त ठेवावा असा एखादा नियम आहे की काय असा प्रश्न त्यांना साहजिकच कोणीही विचारील.

या गोष्टींचा येथे उल्लेख करण्याचे कारण भृगुसंहिता व नाडी ग्रंथ खोटे ठरविण्याचा काही लोकांचा जाणीवपूर्वक प्रयत्न असूनही त्यामध्ये कोणालाही अद्यापि यश आलेले नाही, हे वाचकांना कळावे हे आहे. समजा एखाद्याला या ग्रंथांचा अनुभव आला नाही, तरीही संपूर्ण नाडी ग्रंथ व भृगुसंहिता खोटे ठरत नाहीत. एखाद्या डॉक्टरला आपल्या धंद्यात अपयश आले म्हणून संपूर्ण वैद्यक शास्त्र खोटे आहे, असे आपण कधी म्हणतो काय ? तसेच काही ठिकाणी अनुभव आला नाही म्हणून इतरांना आलेला त्या ग्रंथांचा अनुभव खोटा आहे, असे ठरत नाही व झाडून सर्वच ग्रंथ काही आपण खोटे म्हणत नाही.

ज्ञान नसलेले लोक प्रयत्नवाद व नियतीवाद (दैववाद) असा खोटा वाद निर्माण करतात.

हे पुढील सुभाषितात मार्मिकपणे सांगितले आहे की,

पूर्वजन्मकृतं कर्म तद्दैवमिति कथ्यते ।
तस्मात् पुरुषकारेण विना दैवं न सिध्यति ॥

अर्थ : मागच्या जन्मात केलेल्या कर्मांला (प्रयत्नाला) (या जन्मात) दैव म्हणतात. म्हणून प्रयत्न केल्याशिवाय दैव (कधीच) सिद्ध होत नाही.

'कर्म' एकच. पण एका बाजूने त्याला 'प्रयत्न' म्हणतात व दुसऱ्या बाजूने त्याला 'दैव' म्हणतात, हे तेथे मार्मिकपणे सांगितले असून प्रयत्नवाद व दैववाद ह्यातील विरोध खोटा असल्याचे (पुनर्जन्म सिद्धांताने) सुचविले आहे. हा खोटा विरोध कोण निर्माण करतो । अर्थात् अहंकारविमूढात्मा, म्हणजे हे सर्व 'मी' करतो असे समजणारा अज्ञानी (अहंकारी) मनुष्य खरे तर (अहंक[illegible] 'मी' काहीच करत नसतो. सर्व काही ईश्वरच करीत असतो.

विश्व हे नाटक आहे हे कळाले की मानवाला ईश्वराहून वेगळे इच्छास्वातंत्र्य आहे, हे खोटे, हे कळते; आणि विश्व हे नाटक आहे, हे ज्याला माहीत नाही, त्याच्या दृष्टीला स्वत:ला वेगळे इच्छास्वातंत्र्य आहे हे खरे वाटते. मग 'चमत्कार' खरे मानणाऱ्याला असे 'चमत्कारां'च्या नियमभंगाच्या उपपत्तीची समस्या सोडवता येत नसल्यामुळे 'चमत्कार'च नाकारण्याचा, म्हणजे ते खोटे म्हणण्याचा, आडमुठेपणा करावा लागतो !

प्रकरण ६

# पुनर्जन्म आणि नाडी भविष्य

पुनर्जन्म हा विषय जितके वेळा चर्चिला जातो तितक्या वेळा शेवटी कल्पना का वास्तव या द्वंद्वात अडकून अनुत्तरित राहातो. असे सामान्यत: आढळते. प्रसारमाध्यमांनी पुरोगामी विचारांचा मुखवटा चढवलेला असल्याने त्यांना पुनर्जन्म ही वस्तुस्थिती आहे असे ठामपणे म्हणणे गैरसोयीचे वाटते. या माध्यमांच्या बळावर काही बुद्धिवादी मंडळी आपल्या विचारधारेमुळे समाजावर प्रचंड मोठा परिणाम होत आहे. या संभ्रमात असतात. मात्र गणपती दूध प्याला हे हजारोंनी नव्हे लाखो देशी, विदेशी लोकांनी अनुभवून श्रद्धेची शक्ती किती धबधबीत आहे याची चुणूक दाखवताच ती घटना घडलीच नाही असे मानून तिला अफवा या सदरात ढकलून मोकळे होतात. या लेखात पुनर्जन्म सिद्धांत व कर्मविपाकाच्या अपरिवर्तनीय नियमावर नाडी ग्रंथांच्या भविष्याचा पाया आधारित आहे असे विविध महर्षी अगस्त्य, वसिष्ठ, काकभुजंदर, अ॑., भृगु आदिंनी दिलेल्या लेखी पुराव्यांवरून निर्विवादपणे सिद्ध झालेले आहे. तरीही काही लोकांना ते मान्य करणे अशक्य होते. त्यांचे सामान्यपणे तीन गट पडतात. एक गट त्यांच्या धार्मिक शिकवणीमुळे तर दुसरा गट धर्मातील तत्त्वज्ञानाला धुडकावून वेगळी बुद्धिप्रामाण्यवादी वृत्ती असलेला. तिसरा मध्यममार्गी "नक्की काय असे कोणाला ठाऊक !" असे मानून गप्प बसणारा. पण त्यामुळे पुनर्जन्माला अजून वैज्ञानिकांनी मान्यतेचा शिक्का मारलेला नाही याची शेखी विज्ञानवादी विचारकां-कडून मिरवली जाते व पुनर्जन्म हा विषय क्रिकेटच्या अनिर्णित कसोटी सामन्यासारखा लटकलेला राहातो.

क्रिकेटमधील सामन्यात बरेच वेळा क्रिडांगणातील अंपायर हवेत हातांनी चौकोन काढून पॅव्हेलियनमध्ये बसलेल्या तिसऱ्या अंपायरला निर्णयासाठी विचारणा करताना आपण पाहतो. तिसरा अंपायर त्याच्या समोर ठेवलेल्या टीव्हीवरील विविध कोनातून मिळणाऱ्या चित्रांवरून निर्णय देतो. कारण विविध कोनांतून ठेवलेल्या कॅमेऱ्यांमुळे त्याला एखा तऱ्हेची दिव्यदृष्टी प्राप्त होते. त्यामुळे त्याचा निकाल अंतिम मानला जातो. जसा क्रिकेटमध्ये तिसरा अंपायर दूरस्थ ठिकाणी बसूनही घटनांना आधुनिक दिव्यचक्षुंनी पाहू शकतो हे आपणाला रोजच्या उदाहरणांवरून मान्य होते तर ज्या घटना आपणास अज्ञात आहेत त्यांना पाहाण्याची दिव्यदृष्टी ज्यांना प्राप्त झाली आहे. ज्यांनी नाडी ग्रंथ भविष्याची रचना केली आहे अशा महर्षींकडून मिळणाऱ्या पुर्नजन्मा-बाबतच्या माहितीला ती खोटी आहे असे मानणे योग्य आहे का ? महर्षी अगस्त्य, वसिष्ठ, काकभुजंदर, अत्रि, भृगु आदि महर्षींनी आपल्या प्रज्ञा चक्षुंनी पाहून वर्णन करून ठेवलेले पुनर्जन्मचे पुरावे हे क्रिकेट मधील तिसऱ्या अंपायरच्या अंतिम निर्णयाप्रमाणे ठरतात व नाडी ग्रंथ भविष्य हे एका अर्थाने पुनर्जन्माचे निर्णायक पुरावे सिद्ध होतात.

यापूर्वी पुनर्जन्म मान्य न करणाऱ्यां-कडून पुनर्जन्माच्या आठवणी अत्यंत कोवळ्या वयातील म्हणजे २ ते ५ वर्षांच्या लहान मुलांनी सांगितल्या असल्याने त्यांच्या बोबड्या बोलांवर कितपत विसंबून खरे मानायचे ? असा युक्तीवाद केला जाई. उलट ती मुले इतकी लहान आहेत की त्यांना मुद्दाम जुळवून मनघडंतपणे रचून थापा मारणे जवळजवळ अशक्य आहे असेच मानावे लागते असा युक्तीवाद पुनर्जन्म मानणाऱ्यांच्या कडून केला जाई. त्यावर लहान मुले खोटेपणा करत नसतील तर त्यांचे पालक त्यांना मिळणाऱ्या प्रसिद्ध, मान-सन्मान व कधी कधी संपत्तीवर डोळा ठेवून त्यांच्या मुलांना असे बनवून सांगायला भाग पाडत असतील असा ही आरोपवजा युक्तीवाद केला जाई. परंतु या तर्कवादाला नाडी ग्रंथ भविष्यातील पुनर्जन्म कथनातील पुराव्यामुळे कायमचे व अंतिम उत्तर मिळाले आहे. तरीही कुत्राचे शेपूट वाकडे ते वाकडेच या न्यायाने पुनर्जन्म न मानणारे त्यांच्या वैचारिक बांधिलकी-मुळे कसे त्यांच्या पूर्वाग्रहाच्या दावणीला बांधलेले राहातात. हे पुढील काळात

त्यांनी केलेल्या नव्या तर्कावरून नक्कीच दिसून येईल. असो.

नाडी ग्रंथ भविष्यात १३ नंबरच्या कांडात अगस्त्य, वसिष्ठ, काकभुजंदर, अत्रि, भृगु आदि महर्षी नाडी ग्रंथ भविष्य अवलोकन करणारी व्यक्ती पूर्वजन्मात कोण होती, तिने काय पूर्वकर्मे केली, याचा तपशील सांगतात. त्याच्या त्या जीवनातील दुष्कर्माची फळे, शारीरिक व्यंग, किंवा खुणा याची अचुक माहिती सांगितली जाते. त्यावरून सध्याच्या जीवनात भोगायला लागणाऱ्या कारणांचा छडा लागतो व वेळीच शांती-दिक्षा केली तर त्या मधून कमी-अधिक प्रमाणात सुटका होते. ते कष्ट त्रास, भोग सहन करायला मानसिक शक्ती व आधार मिळतो.

महर्षींनी दिव्य दृष्टीने लिहिलेल्या नाडी ग्रंथ भविष्यात पुनर्जन्माच्या उल्लेखाचा आधार मानून अनेक जणांनी त्या दृष्टीने शोध घेतला. काही प्रमाणात यश मिळवले. मात्र पुण्याच्या डॉ. दिलीप नहार यांनी केलेला पुनर्जन्मातील व्यक्तीचा पाठपुरावा थक्क करणारा आहे. (संपूर्ण माहितीसाठी प्रकरण - ७ पहा)

प्रस्तूत लेखकानेही विविध महर्षींच्या नाडी ग्रंथ भविष्य पट्ट्यांमधील सांगितलेले पुनर्जन्म शोधून काढण्याचा आपल्या परीने प्रयत्न केला आहे. परंतु अपुऱ्या माहितीमुळे त्यांची खात्री करणे त्याला शक्य झाले नाही. परंतु पुढील कालात याबाबत अनेक व्यक्ती जास्त जास्त प्रमाणात शोध लावतील व अशांना योग्य ती सर्व माहिती महर्षी पुरवतील. अशी खात्री वाटते. असो.

भारतीयांची एक मनोवृत्ती आहे की गोऱ्यांच्या देशातील विद्वानांनी खात्रीची मान डोलावली का तर मग आम्हीही त्यांच्या हाताला हात लावून 'मम' म्हणणार. फक्त या कारणासाठी काही पाश्चात्यांचे शोधकार्य वाचकांना प्रस्तूत करीत आहे.

मॉन्ट्रियल (कॅनडा) मध्ये १९१८ साली जन्मलेले डॉ. आयन स्टीव्हनसन यांनी आपला सध्याचा जन्म पुनर्जन्मावर शोधकार्यासाठी वाहून घेतला आहे. जगभरात ते या घटनांचा शोध करत राहिले. विविध देशातील २५०० केसेस हाताळल्या. पुनर्जन्म सांगणाऱ्या व्यक्तींशी संपर्क साधला. प्रत्येक केसचा प्रत्यक्ष ठिकाणी जाऊन आधुनिक शास्त्रोक्त साधनांनी व प्रयोगशाळेत विविध चाचण्या घेऊन सखोल व अत्यंत काटेकोरपणे शोध करून, लेख बनवून त्यांचे ग्रंथ प्रकाशित केले. मान्यवर संस्थांनी त्यांच्या शोधकार्याची दखल घेतली. 'Twenty cases suggestive of Reincarnation (1966) या 'Cases of Reincarnation type Vol. I, II, III' व ग्रंथाचे अनेक भाषांमधून रूपांतर अनेक देशात घरोघरी पोचले. त्यांचा या विषयावरील 'Children Who Knew Their Past Lives' हा ग्रंथ ही जिज्ञासूंनी पाहावा.

पुनर्जन्माच्या सिद्धांताला बळकटी आणणारा सज्जड पुरावा म्हणजे जन्म खुणा. शरीरावरील जन्मखूण त्या मुलाच्या कथित मागच्या जन्मातील व्यक्तीला अनैसर्गिकरित्या-उदा. शस्त्राने शरिरावर जिथे जखम झाली होती त्याच ठिकाणी खूण असल्याचे सिद्ध झाले. -आणि ते अनेक उदाहरणात सिद्ध झालेही-तर तो पुनर्जन्मचा बिनतोड पुरावा मानला जातो. अशा खुणा अनुवंशाने होत नाहीत. उदा. जन्मजात एकच कान तुटका असणे, एकाच हाताची बोटे तुटलेली असणे आदि. अशा घटनांचा पुनर्जन्म जागवण्यात सक्रीय सहभाग असतो. अशा तऱ्हेच्या जन्मखुणांचा फोटोसह प्रत्यक्ष पुरावा ही त्यांनी सादर केला गेला आहे.

संमोहन पद्धतीने पुनर्जन्म आठवण्याची शिबिरे घेतली जातात. जी. एल. व्हीटन या डॉक्टरने 'Life cetween Life' या ग्रंथातून या बाबत माहिती दिली आहे. 'Karmic case studies या विभागातून ती माहिती मिळते. कोचावर झोपून अतींद्रीय दृष्टीने भविष्यकथन करणाऱ्या अमेरिकेतील सुप्रसिद्ध एडगर केयसी नंतर कर्म सिद्धांताला शास्त्रीय आधार मिळवून देणारा हाच ग्रंथकार आहे. संमोहन पद्धतीने पुनर्जन्माची शक्यता पटवून देणाऱ्यांमध्ये हेलेन वॅम्बॅच या बाईंनी शेकडो लोकांना सामुहिक संमोहनातून एकाच वेळी शेकडो पुनर्जन्माच्या स्मृतींना जागवले आहे.

पुनर्जन्माची कल्पना प्राचीन व सार्वत्रिक असली तरी शोधकार्य गेल्या ५०-७५ वर्षातील आहे. डॉ. के. के. सहाय यांचे १९२७ साली बरेलीहून प्रसिद्ध झालेले 'Reincarnation: Verified cases of recirth after death !' हे इंग्रजीतील या विषयावरचे पहिले पुस्तक आहे. 'An inquiry into the cases of Shantidevi' हे १९३६

साली प्रसिद्ध झाले. गुप्ता, शर्मा, माथुर या लेखकांचे नाव पुनर्जन्म विषयात नेहमी काढले जाते. शांतीदेवी हे प्रकरण इतके लोकप्रिय आहे की, पुनर्जन्मावरील लिखाणाची सांगता या पुस्तकाशिवाय होत नाही. या प्रकरणा-तील बनवेगिरी प्रसिद्ध करण्यासाठी स्टुअर लोन्मार स्ट्रँड या नावाचे एक स्वीडिश ग्रहस्थ आले. पूर्ण शोध घेऊन झाल्यावर या केसमध्ये काहीच नाव ठेवायला जागा नाही असे विधान त्यांना करावे लागले आणि पुनर्जन्माला मान्यता देणारा निष्कर्ष स्टुअर्ड सारख्या विदेशातून पुनर्जन्माचे खंडन करण्याचा चंग बांधून भारतात आलेल्याला काढावा लागला.

पुनर्जन्माचे शास्त्रीय संशोधन कसे करावे याचे मार्गदर्शन करणारा ग्रंथ डॉ. जमुना प्रसाद यांनी 'New Dimensions in Reincarnation research' या नावाने प्रसिद्ध केला आहे. राजस्थान ब्यावर येथील प्रो. कीर्ति स्वरूप रावत, प्रो. सत्यवंत पसरीचा, प्रो, उत्तरा हुद्दार यांची नावे ही याबाबत शोधकार्यात घेतली जातात. पुनर्जन्मातील केसेस मधील व्यक्तीला अंतस्थ प्रेरणांमधून पुनर्जन्मातील घटना आठवतात. त्या-मधून शोध घेतला जातो. त्यावर २-५ वर्षांच्या मुलांचे बोलणे, वागणे याचा गवगवा, धोकशी आईबापांना प्रसिद्धी मिळवण्यासाठी तयार केलेले 'बनाव' अशी शेलकी दूषणे दिली जातात. नागपूरच्या उत्तरा हुद्दारांना त्यांच्या पूर्वजन्माच्या व्यक्तीच्या नुसत्या आठवणी येत नसत, तर त्या व्यक्तीच्या बंगाली भाषेचा, हावभावांचा, पेह-पोषाखाचा बदल महिन्यातील अष्टमीला प्रदीर्घतेने घडत असे. तो ही त्या पूर्ण शुद्धीत व पूर्ण तरुणपणातील वर्षांत घडत असे. पुण्याच्या कै. डॉ. वसंत अकोलकरांनी या केसचे संपूर्ण संशोधन केले व उत्तरा हुद्दार त्या काळात पुनर्जन्माच्या जीवणाची आठवण त्या अवधीत अनुभवित असल्याचा निष्कर्ष काढला. त्यामुळे पुर्नजन्माच्या आठवणी म्हणजे बालपणींची वायफळ बडबड हा आक्षेप संपूर्णपणे निकालात निघाला.

डॉ. ॲनी बेझंट या त्यांच्या पूर्वायुष्यात पक्क्या विज्ञानवादी व निरीश्वरवादी होत्या. त्यांनी पुनर्जन्मवाद व कर्मविपाक यामधून जगातील प्रत्येक समाजातील जन्मजात असमानतेची सांगड घालता येते, असे प्रतिपादन केले आहे. ख्रिस्त पुराणातील पुनर्जन्माला मान्यता देणाऱ्या उताऱ्यांना कौन्सिल ऑफ नाईस तर्फे सन ५५३ च्या दरम्यान बंदी घालण्यात आली असे पुरावे मिळतात. रिपब्लिक या सुप्रसिद्ध ग्रंथात प्लेटोनेही आत्मा पुनर्जन्म घेतो असे म्हटले आहे, लेबॅनन भागातील ड्रूस या मुस्लीम समाजात असे मानतात की जीवाची प्रत्येक जीवनात प्रगती होते. म्हणून या जन्मात जास्तीत जास्त शुभपुण्य काम करा. कयामतच्या दिवशी सर्वजन्मातील जीवनातील कृत्यांचा ताळेबंद वाचून अंतिम निवाडा होईल.

संमोहनच्या निद्रेत पुनर्जन्माच्या दृष्यांकडे कल्पना किंवा संमोहनाची चार घटका करमणूक म्हणून दुर्लक्ष केले जाते. ठाण्याचे ओशो प्रेमी स्वामी आनंद ऋषींनी त्यांच्या संशोधनपर 'पुनर्जन्म-कल्पना की वास्तव' ग्रंथामधे लोणावळ्यामधील कार्ल एडिंग्टन या जर्मन थेरपिस्टद्वारा त्यांच्यावर केलेल्या प्रयोगामधून विविध पुनर्जन्म जन्मांची आठवण जागृत झाली व स्वतःचे मृत्युचे भय कायमचे नाहीसे झाले असे म्हटले आहे. त्यांच्या याच ग्रंथातील पुढील आवृत्तीत त्यांचे नाडी ग्रंथ भविष्यतील पुनर्जन्म सिद्धांता-वरील विचार वाचायला मिळतील.

नाडी ग्रंथ भविष्यातील पुर्वजन्म कथन ही नुसती कल्पना नसून त्याचा विचार करता सध्याच्या जीवनाशी असलेला संबंध अतूट आहे असे सिद्ध होते. भृगु महर्षी एके ठिकाणी याबाबत सहज म्हणतात, माझा पत्रवाचक पं. शामाचरण त्रिवेदी यांच्या होशियार-पुरच्या बंगल्यात काम करणाऱ्या बाई-कडून एक दिवस अचानक आलेला, एका पायाने अधू (लंगडा) पोपट सेवा करून घेत आहे, जो त्यांच्या बंगल्याभोवती गस्त घालणाऱ्या दोन तगड्या अल्सेशियन कुत्र्यांना न भिता, बऱ्याचदा पिंजऱ्यातून बाहेर येऊनही उडून आकाशात न जाता, वर्षानुवर्षे त्या कामवाल्या बाईच्या हातूनच दाणा-पाणी पिऊन पिंजऱ्यात परत स्वतःला कोंडून घेतो तो पूर्व जन्मात त्या कामवालीचा मुलगा होता. तिने त्याला दिलेल्या मारामुळे त्याला लंगडत जीवन जगावे लागले. तोच याच जन्मी लंगडा पोपट बनून तिच्याकडून सेवा करवून घेत आहे.

# प्रकरण ७ पूर्वजन्मातील व्यक्तिमत्वाच्या शोधाचा ध्यास घेणारे नाडी ग्रंथ प्रेमी डॉ. दिलीप नाहर

पुण्यातील डॉ. दिलीप नाहर शिक्षणाने डॉक्टर. प्रक्टिस भरभराटीची असूनही प्लॅस्टिक उद्योग घरचा असल्याने एके दिवशी दवाखान्याला टाळे ठोकून, चावी म्हात्रे पुलावरून नदीत फेकून, धंद्यात प्रवेश केला. त्यात नाव कमावले. हंसाशी विवाह झाला. दोन मुली, मुलगा असा संसार. मध्यंतरीच्या काळात वास्तुशास्त्रज्ञाच्या सल्ल्याच्या मुद्दाम नेमके उलट करायचे ठरवले व नवी फॅक्टरी डबघाईला आली. वास्तुतज्ञांच्या सल्ल्याप्रमाणे पुन्हा बदल करताच तीच जागा, तीच मशिनरी, तेच कामगार व धंद्यातील वातावरण तरीही असा विलक्षण फरक पडला की विचारता सोय नाही. तेंव्हा पासून वास्तुशास्त्राचे शिक्षण घेतले. ज्योतिषशास्त्र व अन्य विषयात प्राविण्य मिळवले. मित्रांशी गप्पा मारता-मारता नाडी ग्रंथांची माहिती कळली व त्यांनी महर्षींच्या भविष्य कथनाची कॅसेट मिळवली. त्यातील पूर्व जन्मातील उल्लेख त्यांना स्वस्थ बसू देईना. त्यांना सांगण्यात आले होते की, ''कर्नाटकात एक 'अवंदूर' गाव आहे. तेथील 'कोडईमलई' मंदिरात तू पायाने अधू पूजारी होतास. पौरा-हित्याशिवाय, पंचांग-भविष्य पाहून चरितार्थ चालवत होतास. पुढे लालूच निर्माण होऊन भावाची जमीन बळकावलीस. सोने-नाणे वाईट मार्गाने मिळवलेस. पण जीवनाच्या उत्तर काळात पश्चात्ताप होऊन ती जमीन परत करून मगच मृत्यू. आदि.''

डॉ. नाहरांनी पत्नी मुलांसह दक्षिण भारताची सहल सन २००५ च्या चातुर्मासात ठरवली. त्यातच अवंदुर गाव-शिव मंदीर शोधणे हे महत्त्वाचे आकर्षण होते. अवंदूर गाव नक्की कुठे आहे याचा शोध त्यांनी अनेकांना विचारून घेतला. म्हैसूर-तमिळनाडू सीमेवर ते कुठेतरी असावे इतकी माहिती त्यांना मिळाली. म्हैसूरमध्ये राजू गाईडमुळे जागांचा शोध घेणे, भाषेचा प्रश्न सुटला. राजू गाईडचा उत्साही स्वभाव, मुलगी दीप्तीची डॉ.नाहरांना मोलाची साथ, स्वत: डॉ. नाहरांना पूर्वजन्मातील व्यक्तीचा शोध लागेल अशी आंतरिक प्रेरणा व प्रेमळ पत्नीचा खंबीर आधार. टॅक्सीने ३००-४०० कि. मी. लांब फेऱ्या करूनही गाव मिळतच नव्हते. पांडेचरी पर्यंत जाऊन परतल्यावर 'इकडे कुठे आलात अवंदुर इकडे नाही तिकडे' असे चकल्यासारखे होत होते. ३-४ दिवस गेले. मेडीकेरी गावाजवळ अवंदूर असेल तर ठीक नाहीतर परतायचे ठरले. फिरून अगदी थकवा आला होता. उगीच व्यर्थ भटकलो असे वाटत असतानाच राजू गाईडने, ''है एक जगह - चलो मिल गया अवंदूर'' म्हणून उत्साहाने पुकारा केला.

गाडी मेडीकेरीहून जंगलाच्या मध्यात घुसली. बरेच चढण चढून एके ठिकाणी एक मंदिर सापडले. ते होते भवानीचे. आणखी शोधता दूर डोंगराच्या पलिकडे एक मोडके शिवमंदीर आहे पण तिथे कोणी जात नाही असा छडा लागला. तेथे दम छाक होत पोचल्यावर पुजाऱ्यांशी भेट-चर्चा झाली. कळले की 'त्यांच्या पैकी एक पुजारी काम करीत असतात. ते पायाने अधू असावेत. पण यापेक्षा आम्हाला अधिक माहिती नाही.' दोन ट्रस्टीही तोवर थमले. त्यांना आमच्या तेथे जाण्याचे कारण समजल्यावर तेही बरोबर आले.

जंगलाची वाट तुडवत डोंगराला दोन कि. मी. वळसा घालून एके ठिकाणी ते पोचले. सोबतचा पुजारी तेथील कानडी पाटी वाचून घाबरला. तिथे लिहिले होते - 'दुर्घटनांमुळे जनसंपर्कास मनाई आहे'- तरीही डॉ. नाहरांनी धीर केला. त्यांनी मंदिरात प्रवेश करण्याचा निर्णय घेतला. मंदिराचे छप्पर तुटलेले. झाडांच्या फांद्या पडून केंव्हाही कपाळ मोक्ष शक्य. डॉ. नाहरांनी प्रार्थना केली. जप म्हणून पूर्व स्मृतींना जागृत करून तेथील वस्तूचे स्पंदन जाणवले आणि खात्री झाली की हेच ते देवालय. चौकशी करता विहीर सापडली. त्याच्या आसपासच्या भागाला कोडईमलई असे म्हणतात हेही कळले. आधीच्या मंदिराला

तळकावेरी म्हणतात. महाबळेश्वरला असे पाच नद्यांच्या उगमाचे बांधलेले स्थान, पाण्याचा स्त्रोत आहे तसेच साधारण स्थान होते. परतताना पडक्या देवळातील पुरोहिताचे अन्न नातलग बंगलोर येथे राहतात. त्यांचा शोध घेतला सुब्रमन्यु कुटुंबातील डी. एस. शंकर राव यांनी प्रेमाने स्वागत केले. घरात धार्मिक कामाची लगबग होती. पितृपंधरवड्यात पितरांसाठी पिंडदानाचा कार्यक्रम चालला होता. डॉ. नाहर मनात म्हणत होते, स्वर्गीय पितरांचे श्राद्ध ! त्यांच्याच पैकी पुढील जन्मातील एक प्रत्यक्ष उपस्थित ! काय मुहूर्त आहे !.

पुढे चर्चा करता-करता ८-१० पिढ्यांची वंशावळ आणली गेली. त्यापैकी शंकररावांचे एक काका लक्ष्मणशास्त्री अवंतूरच्या शिवमंदिराचे पुजारी होते. हडप केलेली जमीन व मालमत्ता त्यांनी मृत्यु पूर्वी वारसांना परत केली. ती घटना होती सन १९५५ सालची. तर डॉ. नाहरांचा जन्मही १९५५ सालचा. आपण त्यांच्या काकांच्या पुढील जन्मातील व्यक्तिमत्व असल्याचे नाडी ग्रंथातील कथन ऐकून ते थक्क झाले. आदर सत्कार, पुढे भेटीचे निमंत्रण वगैरे मिळाले. आजही डॉ. नाहरांच्या घरच्यांना त्या आठवणींनी अंगावर शहारा येतो. डॉ. नाहरांना पूर्व जन्मातील आपल्या व्यक्तिमत्त्वाला भेटल्याचे आंतरिक समाधान होते.

(डॉ. दिलीप नाहर. पुणे. - ९८७१० ०६२०१

प्रकरण ८

# नाडीग्रंथ ज्योतिष अधिवेशनात नाडी ग्रंथ शास्त्रींचा गौरव

महाराष्ट्रातील अनेक नाडी ग्रंथ भविष्य प्रेमी नागरिकांच्या आग्रहास्तव रविवार, दि. १४ ऑक्टोबर २००७ रोजी पुणे येथे एक दिवसीय नाडी ग्रंथ ज्योतिष अधिवेशनात संपन्न झाले. विंग कमांडर (निवृत्त) शशिकांत ओकांनी या अधिवेशनाचे संयोजन केले होते. अधिवेशनाचे उदघाटन ज्येष्ठ रमलज्ञ श्री. चंद्रकांत शेवाळे यांच्या हस्ते झाले. विशेष अतिथी म्हणून माजी आमदार श्री प्रकाश देवळे, डॉ. आर एन शुक्ला व. पुण्यातील ज्येष्ठ पारंपारिक ज्योतिषशास्त्री व अनेक नाडी ग्रंथ प्रेमींचा ही गौरव केला गेला. बेळगावकडील प्राचार्य अक्षयानंद गळतगे यांच्या विज्ञान आणि बुद्धिवाद पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीचे प्रकाशनही संपन्न झाले. त्यावेळी होडीच्या प्रतिकाचे गौरवचिन्ह मानपत्रासह देण्यात आले. याची प्रतिकृती मलपृष्ठावर पहावी.

याशिवाय मुख्य पाहुणे चेन्नईचे इंडॉलॉजीतज्ञ डॉ. जी. जॉन सॅम्युएल यांनी उपस्थितांना इन्स्टियूट ऑफ एशियन स्टडीज या संस्थेतर्फे नाडी ग्रंथावरील शब्दकोशाचे काम लवकर पुरे जाईल असे सांगितले.

सर्वसामान्य नागरिकांसाठी नाडी ग्रंथ भविष्य म्हणजे काय ? ते कसे पाहातात यावर मार्गदर्शन झाले. विंग कमांडर राकेश नंदा, फिरोज मिस्त्री व अनेक नाडी प्रेमींनी आपले अदभूत अनुभव कथन केले. ओकांनी एखाद्याची नाडी पट्टी सापडणे किती अशक्यप्राय असते, भविष्य काळातील घटना अनेकदा मुद्दाम चुकीच्या सांगून कर्मविपाक यथान्याय सुलभपणे कसा साधला जातो याचे उदाहरणासह कथन केले.

उद्यान प्रसाद सभागृहात दुपारी एक ते संध्याकाळी साडेसहा पर्यंत चाललेल्या अधिवेशनासाठी महाराष्ट्रातील १५ पेक्षा जास्त नाडी केंद्र संचालक उपस्थित राहिले होते. त्यात प्रामुख्याने पुण्यातील श्री. ईश्वरन, श्री. मृत्युसामी, श्री. बाला, श्री. मुरलीधरन श्री. अरविंदसामी, नाशिकहून श्री. कीर्ती, कोल्हापूरहून श्री. जयसूर्या, जळगाव-धुळ्याहून, श्री. कन्नन व श्री. सुंदर इत्यादींचा समावेश होता. नाडी केंद्राच्या भावी वाटचालीत संचालकांच्या अडचणी व अन्य विविध २० विषयावर नाडी तज्ञांची मते काय आहेत याची माहिती दिली गेली. त्यातून चांगली सेवा देण्यासाठी नाडी शास्त्रींनी इंग्रजी बोलायला शिकण्यास प्राधान्य, कॅसेट ऐवजी सी. डी करून देणे व अन्य सुचवलेल्या मुद्द्यावर यथायोग्य कारवाई करण्याचे ठरले.

अधिवेशनाच्या काळात ठशांचे नोंदणी करणाऱ्यांना सवलतीच्या दरात भविष्य कथनाची सोय करण्यात आली होती.

प्रकरण ९

# नाडी केंद्रांतून आणखी चांगली सेवा कशी मिळू शकेल ?

**नाडी ग्रंथ प्रेमी हो,**

आपण नाडी केंद्रचालकांच्या कडून आणखी चांगल्या सेवेची अपेक्षा करतो. त्यासाठी काही सुचना प्रस्ताव नाडी ग्रंथ प्रेमींतर्फे मी खाली मांडत आहे. त्यांचा नाडी केंद्र चालकांनी एकत्र येऊन या अधिवेशनात विचार करावा व त्यावर शक्य तितक्या त्वरेने अंमलबजावणी करावी, अशी सर्व नाडी केंद्र चालकांना विनंती करण्यात येत आहे.

१. ताडपट्टीतून कूट तमिळ नाडी भविष्य वाचन करणे अत्यंत कौशल्याचे व किचकट काम आहे. त्याचे प्रशिक्षण आपल्या कुशल मार्गदर्शनाखाली करून आपण आपले शिष्यगण तयार करून ठेवण्याची प्रथा आहे काय ?

२. आपल्या केंद्रातील व्हिजिटर्स बुक्स ठेवता येतील का ? त्यामुळे भविष्य पाहून गेलेल्यांना काय वाटते याची नविन भेट देणाऱ्यांना कल्पना येईल.

३. आपल्या केंद्रातील स्टाफ आपल्या प्रमाणे रोज सकाळी स्नान, जप, मंत्र, पूजा, आरती आदी साधना कर्मे करून मग भविष्यकथनाला सुरुवात करतो का ?

४. प्रत्येक व्यक्तीला नाडी ग्रंथाचे दर्शन होण्यापूर्वी केंद्रातील पूजारूममध्ये जाऊन महर्षींना श्रद्धापूर्वक माझी भविष्यकथन पट्टी मिळावी अशी प्रार्थना करायला आपण सांगता काय ?

५. नाडी केंद्रचालक स्पोकन इंग्लिशच्या क्लासेस मधून इंग्लीश भाषा पटकन आत्मसात करू शकणार नाहीत काय ?

६. अचुक पट्टीचा शोध घेताना प्रत्येक वेळी आपण क छ त प र किंवा क, का, कि, की असे अनेकदा विचारून नावे व अन्य माहिती शोधण्याचा प्रयत्न करता. त्यापेक्षा पट्यांतील नावे वाचून (सुरुवातील फक्त आईचे किंवा वडिलांचे, ते तर जुळले तरच मग त्या व्यक्तीचे) ते नाव जुळते का असे करता येणे शक्य आहे का ? त्यामुळे सामान्य लोकांना जे वाटते की आपल्याकडून माहिती काढून तीच पट्टीतून सांगितली जात आहे असे भासवले जाते. या आक्षेपाचा प्रश्नच उद्भवणार नाही.

७. नाडीपट्टी सापडली की त्यात व्यक्तीचे नाव कुठे व कसे कोरून लिहिलेले आहे. ते जरी एखाद्याला तमिळ येत नसेल तरी आवर्जून दाखवले जाते काय ?

८. नाडी पट्टीतील व वाचकांची भाषा तमिळ. सामान्य लोकांपेक्षा वेगळी असल्याने भाषांतरकाराची अत्यंत गरज असते. बऱ्याचदा भाषांतराचा दर्जा सुमार असतो. त्यामुळे विरस होतो असे वाटते. नाडीवाचकांचा वा भाषांतरकारांचा अनुभव कमी पडत असल्याने बऱ्याचदा भविष्यकथन चुकीचे किंवा पट्टीत न लिहिलेले कथन केले गेले असावे असे वाटत राहते. प्रत्येकाला पुन्हा-पुन्हा केंद्राच्या चकरा मारून अर्थाची फोड करून घ्यायला वेळ नसतो. यावर काय करता येईल ?

९. १४ नंबरच्या कांडातील जपसाधना वैदीश्वरन कोईल सारख्या दूरच्या गावी करण्यापेक्षा आपल्या केंद्रातून करणे शक्य आहे काय ?

१०. आपल्या केंद्रात चढावा म्हणून काही कपडे, फळ-फळावळ, मिठाई, रोख रकम दिली जाते. त्याचा विनियोग आपण आपणासाठी करून उरलेल्या वस्तू गरजूंना द्याव्यात असे अपेक्षित असते. त्याप्रमाणे आपल्या केंद्रातून दान-कर्म केले जाते का ?

११. आपल्या केंद्रात प्रतिष्ठित. नाडीप्रेमीतर्फे आपण गरजूंना वेळोवेळी दान-कर्म करून त्या वेळचे फोटो आल्बम करून किंवा भिंतीवर लावून ठेवले तर नंतर येणाऱ्या लोकांना आपल्या केंद्रातून भविष्य कथना-बरोबर असे सामाजिक कार्यही कसे केले जाते याची कल्पना येईल.

१२. नाडी भविष्याला नावे ठेवण्याचा किंवा त्याचा अपप्रचार करण्याचा काहींचा छंद असतो तर काहींचा धंदा. या लोकांच्या उपद्रवा-पासून संरक्षण करण्यासाठी आपण एखाद्या निष्णात वकिलांची व जवळच्या पोलिस केंद्रातून वेळीच मदत मिळविण्यासाठी आपल्या सचोटीच्या धंद्याची माहिती करून देऊन सोय केली आहेत का ? (भविष्य काळात राज्यात एखादा कायदा करण्याच्या गोष्टी होत असताना नाडी केंद्रांना गाफील राहून चालणार नाही.)

१३. एखाद्याची पट्टी मिळाली तर ती पट्टी त्याला का सुपूर्त केली जाणे शक्य नाही काय ?

१४. तसे करता येत नसेल तर कॉम्प्युटरच्या सोईमुळे नाडी पट्टीतील तेवढाच भाग स्कॅन करून, वही व कॅसेट ऐवजी सीडी देण शक्य आहे काय ?

१५. बऱ्याच लोकांना त्यांच्या व्यस्त कार्यालयीन वेळेमुळे १० ते ६ या वेळेत नाडी केंद्रांना भेट देणे जमत नाही. त्यामुळे सकाळी ९ ते रात्री ९ पर्यंत केंद्र उघडे ठेवल्यास रविवारी/सुटीच्या दिवसांवरील ताण कमी होईल.

१६. नविन गावात केंद्र उभारणीसाठी नाडी प्रेमींची कशी मदत होईल त्यांनी काय करावे ?

१७. आपले केंद्र राहत्या सोसायटीच्या पार्किंग किंवा अन्य वैधानिक गरजा पूर्ण करते काय ?

१८. आपल्या खालील कर्मचाऱ्यांच्या रजा, पगार, जेवण-खाण, औषधपाणी वगैरेची सोय आहे का ?

१९. आपल्या केंद्रातून शाईचे आंगठे पुसण्यासाठी कपडा; स्वच्छ टॉयलेट्सची सोय आहे काय ?

२०. आपला कर्मचारी वर्ग सर्वांचा मान आदबीने राखून व सचोटीने काम करतो काय ?

या शिवाय नाडीप्रेमींनी आपले काही मुद्दे असल्यास मांडावेत. सांगावेत. त्यांचाही विचार आवर्जून केला जाईल. पुढील काळात नाडी केंद्रास भेट देताना वरील मुद्यांची काही अंमलबजावणी होत आहे का याची जागरूकपणे नोंद करावी. ही नाडीप्रेमींना नम्र विनंती

<u>हे पत्रक प्रत्येक नाडीकेंद्रास इंग्रजी व मराठीतून दिले जाईल ते त्यांनी आपल्या केंद्रात मोक्याच्या ठिकाणी लावून ठेवावे असे अपेक्षित आहे.</u>

●●●

**नक्षत्रांची मराठी व तमिळ नावे**

| नक्षत्र क्रमांक | मराठी नाव | तमिळ नाव | नक्षत्र क्रमांक | मराठी नाव | तमिळ नाव |
|---|---|---|---|---|---|
| १ | अश्विनी | अस्विनी | १५ | स्वाती | स्वाती |
| २ | भरणी | भरणी | १६ | विशाखा | विशाहम |
| ३ | कृतिका | कार्तिहे | १७ | अनुराधा | अनुशम |
| ४ | रोहिणी | रोहिणी | १८ | ज्येष्ठा | केटै |
| ५ | मृग | निरुगशी/रिषभम | १९ | मूळ | मूलम् |
| ६ | आर्द्रा | तिरुक तिरई | २० | पूर्वाषाढा | पुराडम् |
| ७ | पुनर्वसु | पुनरपूसम | २१ | उत्तराषाढा | उत्तराडम् |
| ८ | पुष्य | पूसम् | २२ | श्रवण | तिरुओणम् |
| ९ | आश्लेषा | आईल्यम् | २३ | धनिष्ठा | अविट्टम् |
| १० | मघा | महम | २४ | शततारका | सदयम् |
| ११ | पूर्वा | पूरम | २५ | पूर्वाभाद्रपदा | पुरटादी |
| १२ | उत्तरा | उत्तिरम | २६ | उत्तराभाद्रपदा | उत्तराट्टादी |
| १३ | हस्ता | हस्तम् | २७ | रेवती | रेवती |
| १४ | चित्रा | सित्तरै | २८ | - | - |

प्रकरण १०

# नाडी ग्रंथ भविष्य पुढील घटनांच्या संदर्भात बरोबर येतेच असे का नाही ?

नाडीग्रंथ अधिवेशनात या बाबत कडाक्याची चर्चा घडावी अशी अपेक्षा असणे स्वाभाविक होते. कारण अनेकांचा अनुभव ओकांच्या लेखनाशी जुळत नाही असा आहे. मग यावर ओकांचे उत्तर काय ? यावर सविस्तर उत्तर देणे कार्यक्रमाच्या वेळापत्रकात बसणे शक्य नव्हते म्हणून या लेखातून विचार व्यक्त करून सांगण्याचा प्रयत्न ते करीत आहे. प्रत्येकाचे समाधान होईल अशी आशा आहे. माझ्या आधीच्या पुस्तकातून प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांच्या पुस्तकातील महत्वाचा भाग देऊन या प्रश्नाला उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. तो अनेकांनी वाचला ही असेल.

यावेळी फ्लाईंग ऑफिसर धनंजय मोटे या माझ्या जिवलगाचे एक जळजळीत उदाहरण घेऊन यावर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न आहे.

साल २००२. वायुसेनेत पंजाब-मध्ये पोस्टींगवर असताना माझी ओळख फ्लाईंग ऑफिसर धनंजय मोटेशी झाली. सांगलीचा उमदा तरुण, रोज पहाटे जप-साई साधना, ऑफिसच्या कामात हाय ग्रेडिंग, इंग्रजी अस्खलित, बॉक्सिंग गिटार वादन, पेंटिंग-ड्रॉईंग हॉबीज्, थोडक्यात बेस्ट ऑल राऊंडर. लगेच आमची मैत्री झाली. त्याने नुकतीच विकत घेतलेली इंडिका मोठ्या आनंदाने आईला-बहिणींना अभिमानाने दाखविण्यासाठी लुधियानाहून सांगली-पर्यंत त्याने एकट्याने चालवत आणली.

वाटेत पुण्यात त्याचे नाडी भविष्य पहायला तो व मी एकत्र. पट्टी सापडली. उज्वल भविष्य. मोठ्या हुद्यावर बढत्या. मुले-बाळे. भरपूर भरपूर आयुष्य. लग्न या दोन महिन्यात ठरेल. मात्र विवाह वयाच्या पुढील वर्षात घडेल. सातव्या कांडात वधूचे वर्णन- मॉडर्न नावाची, सिनिक ब्युटीच्या ठिकाणची, वगैरे वगैरे पुढील काही दिवसात नाडी कथनाप्रमाणे तंतोतंत वर्णन असलेल्या व्यक्तीशी - पन्हाळ्यातील (सिनिक ब्युटीच्या) जिच्या घराच्या समोर कोरडा तलाव असलेल्या, मॉडर्न नावाच्या स्थळाशी लग्न ठरले. धनंजय तात्काळ विवाहाला तयार असून देखील तिचा व तिच्या मोठ्या बहिणीचा विवाह एकत्र करता यावा म्हणून विवाहाची जी तारीख नक्की झाली ती नेमकी धनंजयच्या वयाच्या पुढील वर्षाच्या वाढदिवसानंतर काही दिवसांची. मी सहपरिवार मुद्दाम विवाह सोहळ्याला हजर. पुढे मी रजा संपवून कामाला हजर. त्याचा हनिमून वगैरेचा प्रोग्राम संपवून तो पत्नीला आणायला व तिच्या आईवडिलांना भेटून पंजाबात ड्युटीवर परतण्यासाठी सांगलीहून कारने निघाला. जयसिंगपूरच्या पुढे रेल्वेच्या ओव्हर ब्रिजवर ट्रकने जबरदस्त धडक दिल्यामुळे जबर जखमी होऊन खलास झाला. पंधरा दिवसाच्या आत. मी त्याच्या फ्युनरलला वायुसेनेतर्फे हजर !

काय ओक ? हे असे कसे झाले ? काय म्हणणे आहे आपले ? आपले महर्षी असे कसे चुकले ? अनेकांचे अनेक प्रश्न. काही बोलून. काही न बोलता. नाडी, नाडी उगाच करतात. चांगली आपटी बसली. काहींचा सात्विक राग. कुठले महर्षी आणि कुठले काय सगळ्या थापा. अनेकांची मते-मतांतरे, काय गलफत असावी. मी विचार करत राहिलो. नाडी वाचकांचा भाषांतरकाराचा काही संबंध नव्हता की त्यांच्यावर ढकलून मोकळे होता येईल.

प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांची वाक्ये कानात घुमत होती. भविष्य पाहाणाऱ्याच्या दृष्टीने जो भूतकाळ असतो तो ऋषीमुनींना (जेव्हा त्यांनी नाडी ग्रंथ लिहिले त्या वेळी) भविष्य-कालच होता. पृच्छकाचा तो भूतकाळ त्या ऋषीमुनींनी अगोदरच भविष्य वर्तवल्यामुळेच बरोबर आला. हे तो नाकारू शकत नाही. तेव्हा भविष्य चुकते हे म्हणणे बरोबर नाही. नाडी ग्रंथ पाहिल्या तारखेनंतर पृच्छकाचे भविष्य चुकत असेल तर ते का चुकावे याला निश्चित कारण असले पाहिजे. म्हणजे भविष्य चुकत नाही मुद्दाम चुकवले जाते. नाडीचा उद्देश कर्मविपाक सुलभ रितीने व यथान्याय घडवून आणणे हा आहे. भविष्य बरोबर सांगणे हा नाही. हे प्राचार्य अद्वयानंद गळतगे यांचे म्हणणे खरेच का ते आपण पाहू.

## नाडी भविष्य तुम्हीच लिहा

आता वाचकांना मी एक विनंती करतो की आपणच नाडी महर्षी व्हा. म्हणजे असे की धनंजयच्या संदर्भातील घटना आपणास माहित आहेत. त्यावरून आपण जणू धनंजयची पट्टी लिहिणारे महर्षी आहात असे माना. आता आपल्याला लक्षात येईल की जर आपल्याला धनंजयच्या पत्नीला विधवा होण्याचे भाग्य सिद्ध करायचे असेल तर तिचा विवाह घडवायला हवा. तो धनंजय सारख्या व्यक्तीशी की ज्याचे आयुष्य विवाहानंतर अत्यंत कमी आहे. आता त्याने नाडी भविष्य पाहिले तेव्हा महर्षींना म्हणूनच आता तुम्हाला एक तर त्याचे भविष्य न सांगून (पट्टी सापडत नाही हा त्यातील एक उपाय) किंवा पट्टीत असे सनसनीत लिहून की त्याने तातडीने विवाह करायलाच हवा. तोही त्याच मुलीशी. यासाठी त्याची पट्टी त्यालाच मिळेल अशी तयार ठेवली जायला हवी. त्यात त्याच्या भावी पत्नीचे हुबेहुब वर्णन आपणास असे केले पाहिजे की त्या मुलीशीच तो विवाह करायला सिद्ध होईल, आता विवाह धनंजय तेव्हाच करेल जेव्हा आपण त्याला त्याचा भावी काळ उज्वल असेल अशी खात्री वाटेल असे लिहाल. आयुष्यात पत्नी, मुले-बाळे असतील. आयुष्याची दोरी बळकट असेल. का असे लिहाल की बाबा रे तू तर चार दिन का मेहमान. तरीही एका मुलीचे आयुष्य तू तिला विधवा करून बरबाद करणार आहे, म्हणून तू तिच्याशी तातडीने विवाह कर. सत्य कथनच करीन असे नाडी भविष्यकार म्हणून जरी आपण लिहिलेत तरी कोणीही सूज्ञ, त्यातून धनंजय सारखा विचारी व्यक्ती ते कधीच मानणार नाही. तो विवाहच करणार नाही. आपण नाडी महर्षी आहात. त्यामुळे आपणास कर्मविपाकाशी तडजोड करता येणार नाही. मग आता आपणाला धनंजयला दीर्घ आयुष्याचे रंगीत स्वप्न दाखवणे भाग आहे. त्याने अन्य कोठल्या मुलीशी विवाह करून उपयोग नाही. म्हणून त्याला सात नंबरचे कांड तयार करून ठेवले पाहिजे. त्यात अशा तऱ्हेने वर्णन केले पाहिजे की जी मुलगी अजून पाहिली नाही तीच माझी पत्नी आहे अशी त्याचीच नव्हे तर त्याच्या घरच्यांची देखील खात्री होईल. 'रम्य पन्हाळ्याला कार मधून जाताना धनंजयच्या घरचे नाडीतून सांगण्यात आलेल्या खुणा जुळत असल्याने त्या मुलीला पाहण्याआधीच म्हणत होते की दादा हीच आमची वहिनी' !

आपण म्हणजे नाडी महर्षी, धनंजयची पट्टी न लिहून त्याच्या मृत्युची घटना घडून गेल्यावर, नाडी भविष्याला बदनाम व्हायला कारणीभूत झालात ? कारण आपणाला भविष्य कथन करणे हा एकच उद्देश ठेवून नाडी पट्ट्या लिहायच्या नाहीत. कर्मविपाक सुलभ व ठरल्या-प्रमाणेच घडावा यासाठी ही आपणास कार्य करायलाच हवे आहे. हे ही लक्षात असू दे की हे लिखाण आपणास कूट लिपीतून श्लोकबद्ध करून, काव्याची सर्व बंधने पाळून लिहायला हवे आहे.

आपणास धनंजयची पट्टी लिहायलाच हवी असण्याचा आणखी एक उद्देश असा की या पट्टी वाचनास ओकांना त्या भविष्य कथनाचे साक्षी करून हे ही दाखवून द्यायचे आहे की पुढे काही काळानंतर नाडी भविष्याकडे लोक जेव्हा प्रश्नार्थक नजरेने पाहतील, आमची निंदा करून अवमान करतील तेव्हा तुला (ओकांना) आमची बाजू मांडता यायला नको का ? कदाचित पूर्वी जसे त्यांच्या पत्नीच्यासाठी आम्ही तीन पट्ट्या लिहून ठेवल्या होत्या. त्यातील शेवटची पट्टी त्यांना आगामी काळात व्यक्तीचे नाव नाडीपट्टीत कसे कोरून लिहिलेले असते हे दाखवून देण्यासाठी एक पुरावा म्हणून उपयोगाला येईन अशी व्यवस्था केली गेली. त्याचप्रमाणे यापुढे ओकांच्या लेखनाने सामान्य लोकांचा आमच्याकडे पहायचा दृष्टीकोन त्यामुळे दूषित राहू नये. यासाठी ही धनंजयची पट्टी कामाला यावी. आपणच नाडी महर्षी आहात. म्हणून म्हणाल की बरेच जण कोणाला मुलगा होईल सांगितले व मुलगी झाली तर आमच्यावर रुसतात. खट्टू होतात. असे समजा की मराठीत 'मूल' च्यापुढे 'गा' आणि 'गी' मध्ये काना-मात्रेचा कितीसा तो फरक ? तमिळमधेही तसेच आहे. त्यात हात न उचलता लिहायच्या प्रथेमुळे लेखनिकांकडून होतो असा विपर्यास. मुलामुलींचे विवाह सांगितल्यावर हुकूम घडत नाहीत तेव्हा त्या व्यक्तींच्या विवाहाला दीर्घ काळ लागणार असला तरी उदासीनता न यावी असाही उद्देश आम्हाला ठेवावा लागतो. म्हणून पुन्हा पुन्हा शांती दिक्षेची मात्रा द्यावी लागते. तेव्हा नाडी भविष्य चूक, खोटे असे सरसकट म्हणणे कितपत योग्य आहे याचा विचार आपण करावा.

प्रकरण ११

# नाडी ग्रंथ पट्टी मिळणे ही किती अशक्यप्राय गोष्ट आहे ?

सहज कल्पना करा की आपण एक प्रचंड पूर आलेल्या नदीच्या पात्रावरील पुलावर मजा म्हणून उभे आहात. गंमत म्हणून खिशातून काड्याची पेटी काढून त्यातील एक काडी त्या घोंघावणाऱ्या पाण्याच्या प्रवाहात फेका. नंतर काड्याच्या पेटीतील आणखी एक काडी काढून ती फेका. आता त्या दोन काड्या प्रवाहात कुठेतरी पडून दिशेनाशा होतील. आता विचार करा की काही सेकंदाच्या फरकाने फेकलेल्या त्या काड्या कधी पुन्हा एकत्र येतील काय ? सामान्य उत्तर कधीच नाही असे असेल. तथापि, गणितज्ञ या उत्तराशी सहमत होणार नाहीत. कारण ते गणिती आकडे मोड करून अतिशय क्लिष्ट संख्या मांडून, "अति दुर्मिळ पण अशक्य नाही" असे त्यांचे उत्तर देतील. या पुढे असा विचार करा की त्याच काड्या काही कारणानी, काही काळानी त्याच काड्याच्या पेटीत पुन्हा एकत्र येतील काय ? याचे उत्तर मात्र असे घडणे अशक्य कोटीतील आहे, असे येईल.

का ? तर त्या वेळची परिस्थिती संपूर्ण बदललेली असेल. काड्या मोडून गेल्या असतील. माणूस जागेवर नसेल. नदीत पाणी नसेल. आणखी हजारो कारणे असतील की ज्यामुळे त्या दोन काड्या पेटीत एकत्र येणे शक्य होणार नाही. तरीही 'असे अघटित घडेल' असे कोणी म्हणाला तर त्याला मूर्खात काढले जाईल. तर्क मान्यता देणार नाही. बुद्धीने विश्वास ठेवणे अशक्य होईल.

ते कसे शक्य आहे ? आता असा विचार करा की ती घोंघावणारी नदी म्हणजे काळाचा एक प्रचंड ओघ आहे. त्याच्या एका टोकावर नाडी भविष्य कर्त्या महर्षींनी ताडपत्रावर कोरून एका व्यक्तीची पट्टी त्या काळाच्या प्रवाहात सोडली. जणू काड्यापेटीतील एक काडी ! मधे किती काळ गेला. कोणालाच माहीत नाही. पुढे एक व्यक्ती जन्माला आली. जणू काही काड्याच्या पेटीतील दुसरी काडीच. काही विशिष्ट काळ गेल्यावर त्याला आपले भविष्य पाहाण्याची बुद्धी झाली. तोवर त्याच्यासाठी लिहिलेली पट्टी धक्के खात-खात हजारो पट्ट्याच्या गठ्ठ्यात पडून होती. जणु काही तिला माहितच होते की तिला कुठे व कधी त्या दुसऱ्या काडी समान व्यक्तीला भेटायचे आहे. वेळ आली की ती व्यक्ती खूप धावाधाव करून भेटणारच. भले तिला त्या पट्टीतील भाषेचा गंधही नसेल. विश्वास ही नसेल त्याचा की त्याच्या करता कोणी फार पूर्वी पासून एकजण पत्र लिहून गेला आहे. या भावनेने की ती पट्टी त्याने वाचावी व आपले हित कल्याण आहे हे जाणावे. त्या पट्ट्या लिहून ठेवून गेलेल्यांना काही संपत्तीचा किंवा आणखी कशाचा लोभ म्हणून त्यांनी ते पत्र लिहून ठेवलेले नाही. तर निष्काम भावनेने केलेली ती मानवतेची सेवा आहे.

आपण जेव्हा नाडी केंद्रात जातो व आपले भविष्य पाहायला बसतो. ती वेळ इतकी अतिदुर्मिळ असते याची जाणीव प्रत्येकाने ठेवावी. त्या महर्षींनी केलेल्या कार्याची जाण ठेवावी. आपल्याला त्यातील समजेल तितका, रुचेल तितका आनंद घ्यावा. त्यात सांगितलेल्या गोष्टी आनंदाने स्वीकाराव्या. नाही ऐकलेत, बकवास आहे, थोतांड आहे, म्हणालात तर तुमची मर्जी. आता अशांच्या सारख्या पढतमूर्खांना कोण काय करणार ? नाही का ?

प्रकरण १२

# शांती दीक्षा केल्याने काय लाभ ?

नाडी भविष्यात व्यक्तीच्या पुढील आयुष्यातील घटनांचा उल्लेख करण्यात येतो. त्याच्या अंगठ्याच्या ठशाचे वर्णन केले जाते. त्या ठशावरून त्याची पट्टी शुधकली जाते. त्यात त्याचे व अन्य नातलगांची नावे कथन केली जातात. नंतर त्याने केलेल्या पूर्वजन्मा-तील पापपुण्याच्या कर्मातून निर्माण होणाऱ्या परिणामांमुळे त्याला भोगावला लागणाऱ्या कष्टांची, त्रासाची झलक सांगितली जाते. सोबत शांती-परिहार व दीक्षा या अनुक्रमे १३ व १४ क्रमांकाच्या कांडांतून सुचवलेल्या उपासनेद्वारा त्या कष्टांचे, त्रासांचे परिमार्जन होऊन बाधा दूर होतील, नवे मार्ग, नव्या कल्पना, संधी उपलब्ध होण्यास मदत होईल असे महर्षींनी सुचवलेले असते. सामान्यपणे असे म्हणता येईल की बाहेर पाऊस पडत असेल तर तो थांबवण्याची क्षमता आपणात नसली तरी छत्री उघडून हवे तर आपण आपले संरक्षण करू शकतो. ते आपल्या हाती असते. असेच काहीसे नाडी ग्रंथ भविष्य पद्धतीत शांती दीक्षेला स्थान आहे.

### शांतीदीक्षा कशी करावी ?

शांती-दीक्षेचे दोन भाग पडतात. पहिल्या भागात शांती परिहारात काही मंदिरात जाऊन पूजा अर्चना करायला सुचवली जाते. सुचवलेल्या वारी व दिवशीच ठराविक मंदिरात जाणे महत्त्वाचे असते. मंदिरातील कोणत्या मूर्तीस पूजा अर्चना करायला सांगितली आहे याची तत्परतेने नोंद करणे आवश्यक असते. कारण काही वेळा त्याच मंदिरातील मुख्य मूर्तीच्या ऐवजी अन्य देवतेच्या मूर्तीला करायला सुचवलेली पूजा धांदरटपणामुळे वा योग्य मार्गदर्शनाच्या अभावामुळे होत नाही. वेळ व पैसे यांचा अपव्यय होतो. आपण योग्य शांतीदीक्षा करून आलो असल्याचे वाटत राहते.

नाडी भविष्य पाहून झाल्यावर शक्यतो तेव्हाच किंवा शक्य तितक्या लवकर मंदिरांना भेटी व पूजा कराव्यात. कारण पुन्हा तितके दूर जाणे होतेच असे नाही. शुचिर्भूत होऊन मंदिरात शक्यतो उपवास धरून सकाळी पोहचावे. तेथील ऑफिसमधून पूजेच्या पैशाची पावती फाडावी. मंदिरात गाभाऱ्यात पोचल्यावर समोरील मूर्तीकडे भावनिकतेने न्याहाळावे. अन्य लोकांशी संभाषण टाळावे. मंदिर परिसरातील अस्वच्छता, ओल, थंड जमीन, भाषेचा दुरावा, न समजणाऱ्या भाषेतील गाण्यांचा मारा यामुळे मन विचलित न होण्यासाठी मौन व्रत करून मूर्तीवर मन रमवावे. पुजाऱ्याजवळ जाताच आपले नाव, वडिलांचे नाव, गोत्र, नक्षत्र, आदी तत्परतेने सांगावे. त्यासाठी एका कागदावर ती नोंद तयार ठेवावी. अन्य कोणा व्यक्तीसाठी अर्चना करायची असल्यास त्याच्या भल्यासाठी मनातून प्रार्थना करत मंदिरात प्रवेश करावा. पूजासाहित्य खिशाला परवडेल असे घ्यावे. तथापि अर्चना कांडात सुचवल्याप्रमाणेच व सुचवलेल्या क्रमाने करावी. कधीकधी दोन जवळच्या मंदिरांमधील अर्चनेमध्ये एका दूरवरच्या मंदिराचा समावेश असेल तर नाडी शास्त्रींशी चर्चा करून त्याप्रमाणे वागावे. सर्व पूजा संपल्यानंतर नाडी केंद्रात जाऊन तेथील महर्षींच्या फोटोस फळे, फुले, कापड व गोड पदार्थांचे नैवेद्य वगैरे सोपस्कार करावे लागतात. काही दक्षिणाही देण्यास महर्षींनी सुचवलेले असते. ती जरूर द्यावी. ती देत असताना खरोखरच ती द्यावी असा नाडी पट्टीत उल्लेख असतो का की हे नाडी शास्त्रींचे पदरचे वाक्य घालून पैसे उकळण्याचे धंदे आहेत आदी संभ्रम बाळगू नयेत. या संभ्रमांचा सोक्षमोक्ष आधीच लावलेला असावा. अनेक लोक मला या विषयी विचारणा करतात की खरे काय ? अशांना सांगावेसे वाटते की मी स्वतः त्या नाडी पट्ट्या वाचून त्यामध्ये खरोखरच असे अमुक अमुक पैसे द्यावेत, असा उल्लेख असतो याची खात्री करून घेतली आहे. तरीही प्रत्येकाने ती करून मगच दक्षिणा देण्याचे ठरवावे म्हणजे प्रत्यक्ष देताना मानसिक शांती ढळणार नाही. दुसऱ्या भागात विशिष्ट मंत्र करून मिळालेल्या

ताईतासंबंधीच्या सूचना १४ क्रमांकाच्या कांडाच्या नमुन्याच्या प्रकरणात केलेल्या आहेत त्यांचे पालन करावे.

अनेक जणांना शांती दीक्षा करावीच का? नाही केली तर नाही का चालणार? समजा केली तर त्याचा खरोखरच उपयोग होतो की पैसे व वेळ व्यर्थ घालवल्याने मनस्ताप होतो, असा पेच पडतो. फलाची अनिश्चितता व निराशा यामुळे सामान्यांची मनस्थिती गोंधळाची होते. अशा लोकांना ज्यांनी नाडी भविष्य पाहून शांती दीक्षा केली. चांगला व आश्चर्यकारक अनुभव आल्याचे सांगितले अशांचे अनुभव तिसऱ्या आवृत्तीत प्रस्तुत केले होते. ते वाचावेत त्यापैकी अनेकांनी पुण्याच्या अधिवेशनात प्रत्यक्ष अनुभव कथन केले.

**शांती दीक्षा न करण्याचा कुप्रभाव !**

शांती दीक्षा न करण्याचे कुप्रभावही जाणवतात. शांती दीक्षा करण्याचे काही कारणांनी राहून जाते. इच्छा असते पण वेळ नसतो, पैसा नसतो. काहींनी मजा म्हणून नाडी पाहिलेली असते त्यांना शांती दीक्षा करण्यात रस नसतो. काळ पुढे धावत असतो. अकस्मात घटना घडून जातात व नंतर वेळीच शांती दीक्षा केली असती तर बरे झाले असते असे वाटत राहते.

बऱ्याचदा शांती दीक्षा मित्र किंवा दूरस्थ नातेवाइकांकडून केली जाते. त्याचा प्रभाव पडत नाही असे दिसून येते. एकदा एका हवाईदलातील वरिष्ठ अधिकाऱ्याच्या वतीने त्याच्या पत्नीच्या मैत्रिणीने शांती दीक्षा केली.

कालांतराने त्या अधिकाऱ्याचे एका हवाई अपघातात निधन झाले. चौकशी करता असे निष्पन्न झाले की शांती दीक्षा प्रत्यक्ष त्या व्यक्तीने करावी असा स्पष्ट आदेश पट्टीत होता. तो न पाळल्याने वर्तवलेले अरिष्ट अटळ ठरले. म्हणून सुचवलेले उपाय अत्यंत काटेकोरपणे, उच्च भाविकतेने करणे आवश्यक आहेच शिवाय ते त्या व्यक्तीने स्वतः करावेत. अगदीच निरुपाय झाला तर रक्ताच्या नात्यातील निकटवर्तीयांनी ते करावेत, असे सुचवावेसे वाटते.

१४ व्या कांडात एखाद्या देवतेचा मंत्र-१ मंडल म्हणजे ४८ दिवस - अशी २, ३, ४ मंडलांचे जप करायला सांगितले जातात. केंद्रातर्फे मंत्र करण्यासाठी काही रक्कम ठराविक दराने घेतली जाते. मंत्राचे दिवस पूर्ण झाले की पोस्टाने पाकिटातून धातूचा मंतरलेला चौकोनी पत्रा रक्षेसह पाठवला जातो. तो व सोबतची रक्षा यांचा ताईत करून शरीरावर बाळगण्याची सूचना केली जाते. बऱ्याच वेळा सर्व सोपस्कार करून बनवलेला ताईत नाहीसा होतो तेव्हा नाडीशास्त्रींचा सल्ला घेऊन नवा ताईत बनवावा.

या लेखाच्या वाचकांना वरील लोकांचे अनुभवकथन सत्यनारायण कथेप्रमाणे किंवा पौराणिक पोथीतील चमत्कृतिजन्य अध्यायांप्रमाणे अवास्तव वाटण्याची शक्यता आहे. कारण माझे स्वतःचे मत त्या लोकांचे अनुभव ऐकताना असेच झाले होते. तथापि, ते लोक आपल्या अनुभवांशी प्रामाणिक असल्याने त्यांच्या अनुभवांचा उल्लेख आवर्जून केला गेला आहे.

शुभम्

**मराठी महिन्यांची तमिळ नावे**

| महिना क्रमांक | मराठी महिना | तमिळ महिना | महिना क्रमांक | मराठी महिना | तमिळ महिना |
|---|---|---|---|---|---|
| १ | चैत्र | सित्री | ७ | अश्विन | ऐपसी |
| २ | वैशाख | वैहासी | ८ | कार्तिक | कार्तिकेयी |
| ३ | ज्येष्ठ | आनी | ९ | मार्गशीर्ष | मार्घळी |
| ४ | आषाढ | आडी | १० | पौष | तै |
| ५ | श्रावण | आवनी | ११ | माघ | मासी |
| ६ | भाद्रपद | पुरट्टासी | १२ | फाल्गुन | पाकुनी |

**मराठी राशींची तमिळ नावे**

| राशि क्रमांक | मराठी नाव | तमिळ नाव | राशि क्रमांक | मराठी नाव | तमिळ नाव |
|---|---|---|---|---|---|
| १ | मेष | मेषम् | ७ | तूळ | तुलाम् |
| २ | वृषभ | रिषबम् | ८ | वृश्चिक | वृश्चिकम् |
| ३ | मिथुन | मिदुनम् | ९ | धनु | धनुस् |
| ४ | कर्क | कटहम् | १० | मकर | मकरम् |
| ५ | सिंह | सिम्मम् | ११ | कुंभ | कुम्बम् |
| ६ | कन्या | कन्नी | १२ | मीन | मीनम् |

# नाडी ग्रंथप्रेमींचे अनुभव

नाडी ग्रंथ भविष्याची ओळख सामान्य जनतेत हळूहळू वाढते आहे. त्याच बरोबर नाडी ग्रंथ भविष्य केंद्रांची संख्याही भारताच्या वेगवेगळ्या भागात वाढते आहे. नाडी भविष्याच्या अद्भुततेचे वर्णन करणारे अनुभव मला नाडी ग्रंथ प्रेमी पत्राने, फोनवरून मोठ्या प्रमाणात मिळत राहातात. त्यातून प्रत्येकाचा महर्षींच्या बद्दलचा कृतज्ञताभाव निदर्शनास येतो. असे साधारण दिसते की या भविष्याचा अनुभव व्यक्तिगत असल्याने त्याची चर्चा घरापुरतीच सीमित ठेवली जाते. मात्र जेव्हा कधी नाडी ग्रंथ प्रेमी एकत्र येतात, तेव्हा त्यांचे अनुभवकथन अत्यंत रसाळ असते.

## विष्णूकुमार नाटानींचे अद्भूत द्वादशमुखी शिवलिंग मंदिर

आता ज्योतिर्लिंगाच्या दर्शनासाठी फार लांब, लांब व कष्टमय प्रवास करण्याची गरज उरली नाही. जयपूरपासून २५ कि. मी. वर दिल्लीच्या हायवेवर द्वादशमुखी शिवलिंगाची स्थापना झाली आहे.

दि. १ फेब्रुवारी २००६ला त्या मंदिराच्या ३ऱ्या वार्षिकोत्सवाला हजर राहण्याचा योग आला आणि अत्यंत अल्प काळात हा मंदिर परिसर, एक महत्त्वाचे तीर्थक्षेत्र बनणार याची खात्री पटली. प्राचीन काळापासून ज्योतिर्लिंग-पदाची जी १२ स्थाने प्रसिद्ध आहेत त्या सर्व मंदिरांना उभ्या आयुष्यात भेट देणे शक्य नसते. वेळ, पैसा, शारीरिक कुवत, देशाच्या राजकीय मर्यादांमुळे या यात्रा दुरापास्त नव्हे अशक्य होतात. या सर्वांवर मात म्हणून ह्या मंदिराची स्थापना करण्यात आली. याचे पावित्र्य तितकेच प्रखर व वरप्रद आहे. तेव्हा सर्व ज्योतिर्लिंगांची यात्रा या मंदिराच्या भेटीने सफल होते. यात संशय नाही. हे माझे बोल नसून प्रत्यक्ष शंकरांचे आहेत आणि तेही नाडी ग्रंथ भविष्याच्या पट्ट्यांमधून लिखित स्वरूपात आले आहेत. नाडी भविष्य पाहिले/ऐकले की त्याची कॅसेट/वही अडगळीत पडते. यथावकाश त्यातील कथित भविष्य फल विसरले जाते. असे सामान्यपणे घडते. मात्र काहींना नाडी भविष्य जीवनकार्याची प्रेरणा व स्फूर्ती देण्यास कारणीभूत होते. तेव्हा नाडी ग्रंथांची महती आणखी जास्त भावाने जाणवते.

त्याचे असे झाले की, माझे हिंदी-मधील नाडीभविष्याचे पुस्तक जयपूरचे तरुण अॅडव्होकेट श्री. विष्णुकुमार नाटानींच्या वाचनात आले. त्यांचा ज्योतिषशास्त्राचा बराच अभ्यास होता. लहानपणापासून जयपूरच्या "जंतर-मंतर" या खगोल/ज्योतिष शास्त्राला वाहिलेल्या वास्तुपरिसरातील पुस्तकालयातील अनेक ग्रंथ वाचून त्यांनी ज्योतिषशास्त्र आत्मसात केले.

सन १९९८ साली नाडी ग्रंथाचे अनुभव घेण्यासाठी त्यांनी दक्षिण भारतात यात्रा करून भरपूर अनुभव घेतला. त्यांच्या पट्ट्यांमधून अद्वितीय शिवमंदिर स्थापण्याचे सूचोवाच केले गेले. त्याशिवाय त्या वेळी अविवाहित असलेल्या विष्णुकुमारांना त्यांच्या भावी पत्नीचे संपूर्ण चित्र वर्णन केले गेले. त्या वह्यांचे झेरॉक्स अर्थासह त्यांनी मला कळवले व विनंती केली की कोणी जयपूर येथे नाडी केंद्र स्थापन करू इच्छित असेल तर मी त्यांना मदत करू इच्छितो. संयोगाने पुण्यातील सिंहगड रस्त्यावरील नाडी केंद्रातील एक वरिष्ठ वाचक श्री. अशोककुमारनी उत्तर भारतात कोठे नाडी केंद्र काढावे असे विचारायला एकच गाठ पडली. 'जयपूरचे श्री. विष्णुकुमार नाटानींशी संपर्क करून पाहा. ते सर्व मदत करतील' असे सांगताच अशोककुमारांनी पुढील काही काळात जयपूरला नाडी केंद्र स्थापन केले. जोडीला पुण्यातील एका केंद्रातील अत्यंत प्रतिभावान नाडीवाचक श्री. सत्यमूर्तींना सोबत आणले. गेल्या ४/५ वर्षांत हे केंद्र, सध्याच्या राष्ट्रपतींपासून गव्हर्नर, राजकारणी व्यक्ती, उच्चपदस्थ सरकारी अधिकाऱ्यांपासून सामान्य उत्सुकांसाठी तत्परतेने कामाला लागले.

मध्यंतरीच्या काळात श्री. विष्णुकुमार नाटानींनी जयपुरातील तमिळ संगमतर्फे चाललेल्या दक्षिणेश्वर मंदिरातील तमिळ लोकांत मानाचे स्थान मिळवले व त्या मंदिराच्या ट्रस्टने त्यांची कार्यकुशलता व ज्योतिषज्ञान पाहून त्यांना ट्रस्टचे सदस्य केले. त्या वेळी मंदिर परिसरातील उरलेल्या जागी शिवमंदिर स्थापना करावी असे ठरले. परिसराचा आकार व नाटानींची पैसे खर्च करण्याच्या तयारीवरून २५ किलोचे शिवलिंग असावे असा प्लॅन झाला. ग्वाल्हेरच्या एका मूर्तिकाराने लिंग करण्याचे मान्य केले. तथापि हे शिवमंदिर जगातील 'अद्वितीय' कसे असेल याचे नक्की ठरत नव्हते.

त्या वेळी नाडीभविष्य कथनातून १२ ज्योतिर्लिंगाचे मुखवटे लिंगावर असावेत. ते शिवलिंग सामान्यपणे बनते तसे दगडाचे नसून अष्ट धातू, अष्ट रत्नांनी सजलेले असावे. त्याला दुर्मिळ रुद्राक्षांची माळा असावी असा आदेश झाला. त्याप्रमाणे श्री. नाटानी कामाला लागले व काही काळात, सोने, चांदी, तांबे, पितळ व अन्य धातूंमध्ये प्लॅटिनमचा देणगीच्या स्वरूपात ओघ सुरू झाला व होता होता हे शिवलिंग ५ टन म्हणजे ५००० किलोचे बनले. त्यातच सर्व प्रकारची रत्नेजडित झाली. १ ते १४ मुखी रुद्राक्ष मिळविले गेले. श्री. नाटानींनी प्रत्येक ज्योतिर्लिंगाला भेट देऊन मुखवट्यांची चित्रे व ब्लॉक्स मिळविले. त्यांना या कामी दिल्लीच्या श्री. टंडन व जयपूरच्या श्री. गोयल यांनी घरचे कार्य म्हणून सहकार्य केले. वय वर्षे ७० च्या पुढील श्री. टंडन यांनी आपल्या मिंटमधून चांदी/सोने व अन्य धातू मुक्त हस्ताने दिले. आता शिवलिंगाचा आकार पाहता मंदिर भव्य व प्रचंड बनणार होते त्यासाठी तेवढीच मोठ्या आकाराची जागा हवी, ती देखील मोक्यावर.

पुन्हा नाडी पट्ट्यांतून आदेश मिळवला. त्या वेळी महाशिवनाडीतून प्रश्न केले गेले. त्याला स्वत: शिवांनी उत्तर दिले. त्यात मंदिराची स्थापना कुठे करू या प्रश्नाला शिवांनी उत्तर दिले- "तू जिथे मला स्थापू इच्छितोस त्या तमिळी लोकांच्या उरलेल्या जागेत मला स्थापित व्हायचे नाही." पुढचा प्रश्न विचारला गेला, "मग नवी जागा कुठे व ती कशी मिळवू ?" उत्तर आले, "या शहराच्या उत्तर-पूर्वेला २५/३० कि. मी. वर ती जागा असेल व त्यासाठी तुम्ही शोधाशोध करू नका. जागेचा मालक आपणहून भेटेल. तेथे मी स्थापित होणार आहे. इमारत ४ मजली असेल. ते क्षेत्र अन्य ज्योतिर्लिंगांइतकेच पवित्र व प्रखर असेल. त्या कामात एका राजकारणातील व्यक्तीचा सहभाग असेल." पुढील प्रश्न होता, 'स्थापना कशी करावी ?' त्याला उत्तर आले की, "प्रथम एक उंच चौथरा बनवावा. त्यावर माझी स्थापना करताना असे असावे की रहदारीचा रस्ता माझ्या समोर यावा." पुढील प्रश्न होता- 'रुसलेल्या दक्षिण भारतीयांनी केस केली आहे, त्याचे पुढे काय होईल ?' उत्तर आले की, 'त्यात काही दम नाही. ती केस तशीच रेंगाळेल व नंतर समेटाने संपेल.'

उत्तरातून मिळालेल्या आदेशाप्रमाणे, खरोखरच एक जमीनदार कागदपत्रे घेऊन श्री. नाटानींना भेटला व म्हणाला, "माझ्या परदादांनी इच्छापत्रात एक जागा मंदिरस्थापनेसाठी देण्याचे म्हटले आहे. मला कळले की आपण मंदिरासाठी जागेच्या शोधात आहात."

जयपूर - न. दिल्ली हायवेला लागून असलेली प्रचंड किंमत येणारी जमीन माफक भावात मिळाली. श्री. जोशी म्हणून अशोक गहलोतजींच्या मंत्रिमंडळातील वजनदार राजकारण्याच्या प्रयासाने सर्व विघ्ने पार पडून ती जमीन मंदिर ट्रस्टला मिळाली व एका २५ फूट उंच चौथऱ्यावर द्वादशमुखी शिवलिंगाची स्थापना झाली. सध्या ४ मजली मंदिराच्या तळ मजल्याच्या कामाचे दगडी कोरीव काम चालू आहे. पुढील ५/७ वर्षात संपूर्ण इमारतीचे काम पूर्ण होणार आहे.

या मंदिराच्या तृतीय वार्षिकोत्सवाला मला सपत्निक निमंत्रण होते. २ फेब्रुवारी २००६ - वसंतपंचमीला वैदिक पंडितांच्याकडून महारुद्रपाठ व रुद्र हवन केले गेले. त्यानंतर शेखावटी कलाकारांनी डफाच्या तालावर शिववंदना केली. त्यानंतर सजीव शिवलीला हा अत्यंत आकर्षक नृत्याचा कार्यक्रम झाला. त्यात कृष्णरासलीला, सुदामा भेट, हनुमानस्तुती व शिव तांडवाचे नृत्य बहारदार झाले. नृत्यातील विविध मुद्रा आकृती, जिवंत नाग, अजगर गळ्यात, डाव्या मांडीवर पार्वती, छोटा गणेश वगैरे पाहून प्रत्यक्ष ईश्वरीय

भेट झाल्याचे समाधान झाले.

संध्याकाळी उपस्थित हायकोर्टाचे जज श्री. चौहान, शिक्षणतज्ज्ञ पूर्वमंत्री श्री जोशी व अन्य तज्ज्ञांसमवेत नाडी ग्रंथातील शिवर्षींच्या एक एक आदेशाचा प्रत्यक्ष अनुभव आल्याचा दाखला मिळाला. तेथील एकमेकांचे अनुभव देखील थक्क करणारे होते. सर्वांनी प्रतिभावान नाडीवाचक श्री. सत्यमूर्तींची प्रशंसा केली.

सदाशिव ज्योतिर्लिंगेश्वर महादेवाच्या १२ ही मुखवट्यांचे रूप अद्भुत आहे. सर्व प्रकारचे 'रस व मुद्रा' त्यातून स्पष्ट होतात. आरशांच्या सहाय्याने व्यक्तिसमोर बाराही शिवमुद्रा दिसण्याची योजना आहे. जयपूरला गेल्यावर हे मंदिर एक नवे आकर्षक स्थान होणार आहे. सध्या प्रतिकृतीला भेट दिल्याचे समाधान लाभते. त्यात या मंदिराचे अग्रस्थान आहे.

### समर्पित नाडी ग्रंथप्रेमी श्री. हिराभाई बुटालाजी

नाडी ग्रंथप्रेमींमध्ये अग्रणी आहेत- महाराष्ट्रातील खेड (जिल्हा-रत्नागिरी) चे निवासी सुप्रसिद्ध उद्योजक - श्री. हिराभाई बुटालाजी. असे कुठलेही भविष्यकथनाचे स्थान नाही की जेथे हिराभाई आपल्या पत्नीसमवेत भविष्य पाहायला गेले नसतील ! उत्तर भारतातील होशियारपूरच्या भृगुसंहितांपासून, स्वर्गीय बाबूभाई छाया जोशी मुंबई, ते दक्षिण भारताच्या एक एक नाडी महर्षींच्या स्थानांच्या नाडी पट्ट्या त्यांनी शोधल्या आहेत. आपल्या ज्येष्ठ पुत्राच्या वियोगाने व्यथित असूनही अद्याप त्यांचा उत्साह नवतरुणांना लाजवणारा आहे. त्यांना अजातशत्रू, शून्यातून विशाल संस्थांचे जाळे तयार करणारे 'आधुनिक विश्वकर्मा' म्हटले गेले तर ती अतिशयोक्ती ठरणार नाही. त्यांनी नाडी भविष्याची शेकडो पुस्तके लोकांना मोफत भेट दिली. भारतीय संस्कृतीवर अपार श्रद्धा व महर्षींच्या कार्यावर संपूर्ण श्रद्धा व आदर यांचा प्रभाव, त्यांच्या दोन्ही सुपुत्रांवरही पडला आहे. नुकतेच काही वर्षांपूर्वी त्यांना 'इंदिरा गांधी प्रियदर्शनी' पुरस्काराने सन्मानित केले गेले. त्यांच्याजवळ नाडी भविष्याच्या अनेक सत्य घटनांचे अगणित भांडार आहे. ते त्यांच्या तोंडून ऐकणे एक पर्वणी असते.

### 'आदेशानुसार अनुवादक व्हावे लागले !'

आपल्यासारख्या गैर-तमिळ भाषी लोकांना, नाडी भविष्य समजून घेण्यासाठी हिन्दी, इंग्रजी किंवा अन्य भाषिक अनुवादकांची गरज पडते. आपल्या सारख्यांना तर महर्षींचे भविष्य कथन अनुवादकांच्या वाणीतून ऐकायला मिळते. म्हणून अनुवादकाचे स्थान नाडी भविष्य जाणण्यात अत्यंत महत्त्वपूर्ण असते. कारण तेच आपल्या सारख्यांसाठी नाडी महर्षी बनतात ! जेव्हा नाडी पट्ट्यांचे नवे पॅकेट आणण्यासाठी नाडीशास्त्री पट्टीसंग्रहात जातात, तेव्हा मधल्या वेळात भाषांतरकाराबरोबर गप्पा मारताना अनेक रोचक घटना ऐकायला मिळतात. मला जेव्हा तशी संधी मिळते, तेव्हा त्यांचे नाडी भविष्याशी अनुवादक म्हणून नाते जुळण्याचे कारण विचारल्यावर अनेक मजेशीर गोष्टी कळून येतात.

तांबरमच्या नाडीकेंद्रात अनुवादकाचे काम पूर्वीपासून करणाऱ्या श्री. सुब्बरायन, श्रीमती श्रीदेवी व हिंदी अनुवादक श्री. अरुलराज यांचे काम समाधानकारक आहे. सध्या हे श्री. अरुलराज कल्याणीनगरच्या नाडीकेंद्रात काम करतात. जेव्हा त्यांनी त्यांचे आपले नाडी भविष्य पाहिले, तेव्हा त्यात त्यांना 'अनुवादकाचे काम कराल' असे सांगितले गेले होते. तेव्हा त्याप्रमाणे त्यांनी काम करायला सुरुवात केली. मात्र अन्य एकाने आतापर्यंत वैदीश्वरन कोईल, चेन्नई, पुणे, नवी दिल्ली वगैरे शहरातील नाडीकेंद्रात अनुवादकाचे काम केले आहे. त्याने स्वतःचे पहिल्यांदा नाडी भविष्य पाहाताना 'तो यापुढे अनुवादकाचे काम करेल' ही भविष्यवाणी ऐकून त्याला फार हसायला आले. अनुवादकासारखे सटर फटर काम त्याच्या लायकीचे नव्हते असे त्याचे मत त्या वेळी होते, कारण त्या काळात त्याला असलेल्या दुबईतील नोकरीतून मोठी कमाई होत होती. काही काळ सुट्टी काढून तो मजा करायला घरी आला होता व रजा संपवून भरपूर कमाईसाठी पुन्हा दुबईला जाणार होता. टाइम पास म्हणून त्याने मित्रांच्या केंद्रात नाडी भविष्य पाहिले होते. पण भाग्य बदलायला वेळ थोडाच लागतो ! त्या दिवसात कुवेतमध्ये लढाई जुंपली. नोकरी तर होती. परंतु तेथे जाण्यास

बंदी आल्याने त्याच्या सारखे हजारो तरुण गल्फ देशात जाऊ शकत नव्हते. बेरोजगारीची कुऱ्हाड कोसळली. काही महिन्यांत बचतीची लाखो रुपयांची संपत्ती भावा-बहिणींच्यात वाटून दिल्याने, वडिलांच्या आजारपणात खर्च होऊन वगैरे कारणांनी संपली व निर्धन व्हावे लागले. शेवटी काही तरणोपाय उरला नाही म्हणून त्या मित्राच्या नाडीकेंद्रात अनुवादक म्हणून काम पत्करले ! फिरत फिरत अनेक शहरे पाहिली. नवी दिल्लीत राजकारणी तर मुंबईत फिल्म जगताशी संबंधित लोकांचे नाडी भविष्य सांगणारा भाषांतरकार म्हणून बऱ्याच वेळा संधी मिळाली.

पुण्यात एका नाडीकेंद्रात मराठी अनुवादकाचे काम करणारे व नवी केंद्रे काढणारे श्री. ईश्वरन पेशाने फॅशन डिझाईनर मास्टर आहेत. एकदा त्यांनी आपल्या भावाच्या बाबतीतील किस्सा सुनवला. म्हणाले, 'जेव्हा मला माझे नाडी भविष्य पाहताना सांगण्यात आले की तुला यापुढे अनुवादकाचे काम करायचे आहे. ते मी थोडेसे हो-नाही करत मान्य केले. परंतु छोटा भाऊ कृपानंदचा स्वभाव वेगळा होता. लग्नाला तो राजी नव्हता ! नाडी भविष्यात त्याचा अचानक विवाह होईल हे ऐकून तो खो-खो हसत सुटला. मात्र काही काळानंतर कोणा एकाच्या विवाह-समारंभात नातेवाइकांशी गप्पात त्याने मस्करीत एका नातलगातील मुलीच्या स्थळास हो म्हटले. नंतर वडील मंडळींच्या प्रतिष्ठेचा प्रश्न झाल्याने, आईच्या खूप मिन्नतवारीमुळे मोठ्या नाराजीने लग्न करून बसला ! नंतर कथनानुसार अनुवादकाचे काम आनंदाने ठाणे, पुण्यातील केंद्रात करू लागला !'

## ७५ वर्षांच्या उत्साही लक्ष्मी अम्मा !

सामान्यपणे नाडी केंद्रात पुरुषांचे साम्राज्य असते, पण तो समज आता विविध नाडी केंद्रात भाषांतराचे काम करणाऱ्या स्त्रियांनी दूर करण्याचा चंग बांधला आहे.

जळगांव मधील नाडी केंद्रात काम करणाऱ्या लक्ष्मी अम्मांचे वय आहे ७५ च्या पुढे पण अतिशय उत्साही. हिंदी गुजराथी वर प्रभुत्व व प्रेमळ, आर्जवपूर्ण वागणूक यामुळे त्यांना विसरणे अशक्य होते. पूर्वी शिक्षिकेचे काम त्या अहमदाबादेत करीत. तेथेच त्या लहानाच्या मोठ्या झाल्या. त्या गेले ८/९ वर्षे अहमदाबादेच्या व गेली ५ वर्षे जळगांवच्या नाडी केंद्रात भाषांतरकार म्हणून काम करतात.

विश्रांतवाडी भागातील मुरलीधरन यांच्या नाडी केंद्रात उमा कृष्णन व संगीता या दोघी हिंदी व इंग्रजीतून भाषांतरकाराचे काम चोख करतात. दोघींचे सेनेमध्ये जीवन गेले असल्याने हिंदी भाषेवर छान प्रभुत्व आहे. 'प्रिया' नामक भाषांतरकार सांताक्रूजच्या केंद्रात पूर्वी काम करत. तर आणखी एक प्रिया ठाण्याच्या केंद्रात काम करते.

या सर्वजणांचा कामाचा उरक व चटपटीतपणा यामुळे त्यांचा प्रभाव तेथे भेट देणाऱ्यांवर पडतो. व भविष्य-कथन चांगल्या भाषेत मिळाल्याचे समाधान लाभते.

स्व. रघुनाथन टी. नगर, हे नुसतेच अनुवादक नव्हते. संशोधक पण होते. त्यांनी आम्हापर्यंत भगवान बुद्ध, रामकृष्ण परमहंस, सत्यसाई, शिरडीचे साईबाबा, संत तुकाराम, ज्ञानेश्वर आदी महात्म्यांच्या नाडी पट्ट्या हुडकून काढून त्यांचे अनुवादही केले होते. ते एक प्रतिभावान नाडीप्रेमी होते.

श्री. गुरुनाथ एकबोटे ऊर्फ 'जी' व त्यांची मुलगी महालक्ष्मी ऊर्फ बेबीची कथा काही वेगळीच आहे. हे पिता-पुत्री, श्री ॐ उलगनाथनजींच्या बरोबर ईटे नाडीचे अनुवादक म्हणून भारतभर फिरत असतात. श्री. ॐ उलगनाथन-जींची भाची आराधना अनुवादकाचे काम तमिळ सिनेजगतात वाऊन विवाहित होण्याआधी करत असे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे अनुवादकाचे काम म्हणजे चेष्टा नाही. मोठे मोठे राजनेता, अतिविशिष्ट व्यक्तींचे गोपनीय भविष्यकथन करताना भोगायला लागणाऱ्या सुरक्षेच्या कटकटी, दिवसें-दिवस अविरत चालणारे वाचन यामुळे होणारी दमणूक आम्हालाच माहीत आहे. अण्णांची मोठ्या आकड्यांची फी लोकांना दिसते परंतु त्यामागची रात्रंदिवसाची मेहनत, कष्ट व आराधना कोणालाच कळून येत नाही.

वैदीश्वर कोईलमधे पूसाई मुत्थूंच्या केंद्रात काम करणारे प्रो. नटराजन प्रतिभावान अनुवादक आहेत. श्री रमणी गुरुजींच्या आश्रमात काकू भुजंदर नाडी भविष्यचे सार इंग्रजीत सांगणारे

श्री. एम. आर. धम्मींचे कथन साहित्यिक रचनाकाराच्या तोडीचे होते.

### साहसी व जिद्दी नाडी ग्रंथ केंद्रचालिका - व प्रथम महिला नाडीवाचक श्रीमती मल्लिका मीरा

नाडी भविष्याच्या संदर्भात अनेक व्यक्तींची ओळख होते पण श्रीमती मल्लिका मीरांची भेट घेतल्यावर त्यांच्या धीट व साहसी स्वभावामुळे नाडी-ग्रंथाच्या पुरुषप्रधान व्यवसायात त्यांनी घेतलेली झेप पाहून थक्क व्हायला होते.

कल्पना करा. १६/१७ वर्षांची पुण्यातील कॅंपातील केंद्रीय स्कूलमधून १० वी पास झालेली एका सैनिकाची मुलगी. बोलण्यापुरते तमिळ येणारी व हिंदी व इंग्रजीवर चांगल्या प्रकारे प्रभुत्व असणारी ही शाळकरी मुलगी कालांतराने २ मुलांची माता झाली. मोठ्या मुलाला B. Sc केले. तो सेनेत दाखल झाला व धाकट्या भावाच्या उच्च शिक्षणासाठी आईला पैसे पाठवू लागला. पतीच्या विक्षिप्त व लालची स्वभावामुळे कोर्टकचेरीचा प्रसंग आला. काहींच्या सल्ल्यावरून त्यांनी आपल्या घराचा त्याग केला व मथुरेच्या आश्रमात राहण्याचा प्रसंग आला. त्या ठिकाणी ३ वर्षे काढून त्या परतल्या तोवर १३ साल उजाडले. बहिणीच्या आश्रयाने मुलांची शिक्षणे झाली. धाकट इंजिनियर होऊन सॉफ्ट वेअर कंपनीत कामाला लागला आईला त्या संसारात राहायला बोलवू लागला. होता होता एका पेपरमध्ये "चाळिशीच्या पुढे हिंदी-इंग्रजीची जाण असलेल्या व्यक्तीसाठी" नोकरीची जाहिरात होती. उत्सुकतेने फोन करता बोलावले गेले. व निवड होऊन कामाला हजर राहण्यास सांगण्यात आले. नोकरी होती त्रिचनापल्लीमधील एका नाडी केंद्रात. भाषांतरकाराचे काम होते. घरापासून २००/३०० कि. मी. लांब, सगळा पुरुषांचा कारभार असे वाटून नकार दिला गेला; पण फोनवर फोन येऊन शेवटी केंद्रात पुन्हा पदार्पण झाले. तमिळ बोलायला येणे वेगळे लिहिता/वाचता येणे फार कठीण. वय वाढले की भाषा शिकायला कंटाळा येतो. पण मल्लिका मीरांचा उत्साह दांडगा. नाडी केंद्रातील अन्य नाडी वाचकांच्या टोमण्यांना व हिणवण्याला दाद न देता त्यांनी तमिळ आत्मसात केले व नाडी ग्रंथातील तमिळ कथनाचा सुंदर अनुवाद करून मुख्य नाडी चालक श्री. धरणी बालन यांची शाबासकी मिळविली. अल्प काळात त्यांनी अनुवादाशिवाय मालकांचे आर्थिक व्यवहार व केंद्राचे व्यवस्थापन हाती घेऊन सुंदर घडी बसवून दिली. काही काळानंतर हैद्राबादला नवे केंद्र स्थापण्याचे ठरले व त्यासाठी मल्लिका मीरांना हैद्राबादला जावे लागले. तेथून त्यांना सोलापूरला नव्या केंद्रात तातडीने अनुवादकाच्या कामासाठी रवाना करण्यात आले. १/२ महिन्यातच सोलापुरातील काही लोकांच्या कारवायांमुळे नाडी केंद्र बंद पाडले गेले. केस कोर्टात गेली. स्थानिक भाषेचा अभाव, कोणाशी ओळख ना पाळख तरीही मल्लिका मीरांनी ही केस नेटाने चालवली. त्यांचा उत्साह व नाडी महर्षींवरील दृढ श्रद्धा पाहून त्यांच्या केसचे वकीलही थक्क झाले. मद्रासहून या केससाठी त्या येताना पाहून अनेकांनी त्यांना सोलापुरात पुन्हा नवे नाडी केंद्र स्थापण्यास उत्साहित केले. आधी रागावलेले पोलिस, पत्रकार यांच्या व नाडी ग्रंथांच्या बद्दल आदराने बोलू लागले. सोलापूरकरांचा आग्रह, श्री. धरणी बालन यांची खंबीर साथ मिळून खमक्या मल्लिका मीरांनी जाने. २००६ मध्ये सोलापुरात केंद्र स्थापन केले. माझ्या माहितीप्रमाणे नाडी केंद्राच्या पहिल्या महिला केंद्र चालक होण्याचा मान त्यांनी संपादन केला आहे. स्वत:चे घर, मुलांचा त्यांच्या संसारात राहण्याचा आग्रह डावलून एकट्या महिलेने असे केंद्र चालवण्याचे धाडस खरोखरीच साहसी म्हणावे लागेल. कामाचा उरक, धडाडी व परिस्थितीला टक्कर देण्याची त्यांची जिद्द या गुणांना महर्षींनी ताडले व नाडी ग्रंथाची सेवा करण्यास प्रेरित केले.

त्यांच्या नाडी पट्टीचे वर्णन केलेल्या कथनाशी मेळ खाणारे त्यांचे आयुष्य नाडी ग्रंथांच्या सेवेला वाहिलेले आहे असे प्रकर्षाने जाणवते.

नाडी ग्रंथाचे महत्त्व जाणून घेण्यासाठी त्याचा अभ्यास करणे गरजेचे आहे. अनुभव घेण्याचे कष्ट व श्रम न घेता उथळपणे नाडी भविष्याला नावे ठेवण्याची काही लोकांची व संस्थांची व्यावसायिक गरज झाली आहे. नाव, प्रतिष्ठा व पैसा मिळविण्यासाठी कोठल्याही थराला जाणारे विज्ञानवादी म्हणवणारे लोक भारतीय संस्कृतीच्या

महान ठेव्याची निंदा करून त्याला 'खोटे' मानण्यात धन्यता मानतात. त्यांना धीराने व प्रखरपणे तोंड देण्याचे कार्य श्रीमती मल्लिका मीरा यांच्यासारख्या महिलांच्या द्वारे नाडी महर्षी समर्थपणे करवून घेत आहेत.

### आपल्या घरात नाडी केंद्र चालवण्यास अनुमती देणारे श्री. संतोष ओक!

एक दिवशी अचानक नाडी शास्त्री शिवषण्मुगम जेव्हा पुण्यात आले तेव्हा सुप्रसिद्ध इतिहासतज्ज्ञ कै. श्री. पुरुषोत्तम नागेश ओक (मृत्यु ४।१२।२०७) यांचे सुपुत्र संतोष यांनी तत्काळ आपल्या घरात नाडीकेंद्र चालवण्याची अनुमती दिली. कल्याणीनगरमध्ये ते नाडीकेंद्र जाईपर्यंत एक वर्षभर श्री. शिवषण्मुगम त्या जागेतून आपले केंद्र चालवत. श्री. संतोषच्या ओळखीने किती तरी बडी बडी धेंडे नाडी भविष्य पाहायला येत, त्यास गणती नव्हती. श्री. संतोषना वाटते की नाडी महर्षींची ती त्यांच्या तर्फेची सेवा होती. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे त्यांना एका वर्षात लोकांच्या जीवनातील अनेक अंगांचे अनुभव पाहायला, ऐकायला मिळाले. त्यावरून हे भविष्यकथन किती गहन व अवधानपूर्वक लिहिले गेलेले आहे याची जाणीव त्यांना प्रकर्षाने झाली.

### अति तत्पर-नाडीप्रेमी विंग कमांडर राकेश नंदा

भारतीय हवाई दलातील एक अग्रणी नाडी ग्रंथ प्रेमी राकेश नंदा सध्या नागपूरच्या हवाईदलाच्या केंद्रांत आहेत. २००२ मध्ये पुण्यात हॉस्पिटलमध्ये असताना त्यांनी नाडी ग्रंथांचा अनुभव घेतला. हळू हळू भविष्ये खरी ठरू लागल्याने त्यांची रुची वाढली. त्यातच त्यांची बदली चेन्नईला झाली. त्यामुळे तमिळनाडूमधील सर्व व देशातील अन्य भागातील केंद्रांना त्यांनी आवर्जून भेटी दिल्या. माझ्या समवेत त्यांनी होशियारपूरच्या भृगु संहितेचा अनुभव घेतला. त्यामध्ये आमची नावे व अचूक भविष्य वाचून ते थक्क झाले.

राकेशजींची नाडी ग्रंथ महर्षींच्या कामाबद्दलची कळकळ इतकी तीव्र आहे की देशातील कोणत्याही भागातून फोनवरून त्यांच्याशी संपर्क करून त्यांची भेट घेता येते. विविध नाडी केंद्रात गरजू लोकांना नेण्यात त्यांची तत्परता वाखाणण्याजोगी आहे. शांती-दिक्षा तत्परतेने व श्रद्धापूर्वक करा असा त्यांचा आदेश असतो.

आत्तापर्यंत शेकडो लोकांनी त्यांच्या ज्ञानाचा व आदरातिथ्याचा लाभ घेतला आहे. या काळात त्यांनी ज्योतिषशास्त्राची पदवी मिळवली. विपशया ध्यानांची साधना केली.

त्यांच्या अमोघ वाणीतून शांती दीक्षेचे, अन्य अनुभव नुकत्याच पार पडलेल्या नाडी ग्रंथ अधिवेशनात ऐकवले. तेव्हा ती एक पर्वणीच होती. त्यांनी आपले २ मोबाईल त्यासाठी ठेवलेले आहेत.

हे माझे सौभाग्यच की हवाईदलातून मी निवृत्त झालो तरी राकेश नंदांच्या सारख्या वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या रूपाने एक प्रखर नाडी ग्रंथ प्रेमी उत्तरदायी मिळाला.

विंग कमांडर राकेश नंदा -मो. क्र. ९३७२४९००३४, ९८२३६२३१४.

### नाडी प्रेमी कुटुंबिय श्री. उदय व सौ. प्रिया महेता.

युनो, वर्ल्ड बँक या सारख्या प्रख्यात परदेशी संस्थात महत्त्वाच्या पदांवर कार्यरत राहून सध्या पुण्यात स्थायिक झाले हे गुजराथी कुटुंबिय प्रखर नाडी ग्रंथ भविष्य प्रेमी म्हणून नुकतेच परिचित झाले. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे देश-धर्म वा जाती विरहित नाडी ग्रंथाचा अदभूत अनुभव विदेशातील नामवरांना करवून या नाडी ग्रंथ भविष्य कथनाच्या इंटरनेटद्वारे जलद व प्रभावी संपर्क करण्यासाठी ते कटिबद्ध आहेत. पुणे विद्यापीठातील ॲंथ्रोपॉलॉजी विभागातील डॉ. नरेन्द्र बोखारे यांचा सहयोग आहे.

### श्री. राजस खळदकर व तरुणाईचा उत्साह

राजसची ओळख अभावितपणे वेबसाईट मधून झाली. ईमेल लिखाणा-तील त्याचा सराईतपणा, कामाची योजनाबद्ध हाताळणी, झोकून देण्याची वृत्ती आदि गुण दि. १४ ऑक्टोबर ०७ च्या पुण्यातील अधिवेशनाच्या आयोजनात प्रकाशात आले. या शिवाय मनोज बिर्ला व त्याने होडीच्या प्रतिकाची ट्रॉफी बनविण्यात घेतलेला पुढाकार, त्यांच्या खास अधिवेशनाला नागपूरहून आलेला मनीष पाटगे, अकोल्याचा पियुष पांडे, नीरेजवळच्या गुळुंचेचे नवनाथ कुंभार, शशिकांतच्या तरुणाईचा उत्साह, नाडी ग्रंथ भविष्यविषयीचा आदर व श्रद्धा भाव वाखाणण्यासारखा होता. त्यांच्यामुळे लक्षात राहण्यासारख्या अधिवेशनाची सांगता झाली.

प्रकरण १४

# नाडी ग्रंथपट्ट्यांचे वय आणि कार्बन १४ कसोटी

नाडी ग्रंथ भविष्यावर माझे लेख, पुस्तके प्रसिद्ध झालेली आहेत. त्यामधून नाडी ग्रंथपट्ट्यांच्या ऐतिहासिकतेची चिकित्सा केली गेली. त्यातील एक महत्त्वाचा भाग म्हणून नाडी ग्रंथपट्ट्यांचे वय किती असेल याची कार्बन १४ कसोटी करून शोध घेणे मला नाडी ग्रंथप्रेमी या नात्याने क्रमप्राप्त होते. परंतु ते काम माझ्यापेक्षा अन्य, विशेषतः परदेशी व्यक्तीने त्याच्या देशातील प्रयोगशाळेत केले तर त्यामुळे माझ्यावर म..लाशी करून मिळवलेला किंवा काढलेला रिपोर्ट असे लांछन लावले जाऊ शकणार नव्हते.

नाडी पट्ट्यांची कार्बन १४ कसोटी परदेशातील प्रयोगशाळेत केली जात आहे, असे मला कळले होते. परंतु ती कसोटी कोण, कुठे व कसे करत आहे याची माहिती नुकतीच माझ्या हाती आली. 'उवे निप्पर' नामक एका जर्मन नाडी ग्रंथ भविष्यप्रेमी व्यक्तीच्या वाचनात असे आले की जर्मन भाषेत 'थॉमस रिटर' या लेखकांनी नाडीभविष्यावर लिहिलेल्या एका पुस्तकात नाडी ग्रंथपट्ट्यांची कार्बन १४ कसोटी "दि न्युक्लिअर रिसर्च सेंटर रोझेनडॉर्फ सॅक्सेन जर्मनी" मधील 'इन्स्टिट्यूट फॉर आयन-रेडिएशन-फिजिक्स' या प्रयोगशाळेत करून नाडी ग्रंथपट्ट्यांचे वय ३५० ते ४०० वर्षापर्यंत प्राचीन असल्याचा निर्वाळा तेथील दोन शास्त्रज्ञांनी दिला असल्याचे नमूद केले आहे. त्या पुस्तकातील या संदर्भातील ८१ ते ८५ पानावरील मजकुराचे इंग्रजी भाषांतर श्री. निप्पर यांनी करून दिले, ते मराठीतील नाडी ग्रंथ प्रेमींसाठी गोषवारा करून प्रकाशित करत आहे.

थॉमस रिटर आपल्या पुस्तकात म्हणतात, "मी १९९४ च्या उन्हाळ्यात (भारतातील काही नाडी ग्रंथ भविष्य केंद्रांना भेटी देऊन) परतताना नाडी ग्रंथपट्ट्यांचे सॅम्पल मिळवले. जर्मनी-मधील तमिळ भाषातज्ज्ञांकडून नाडी-पट्टीत माझे नाव असल्याची तसेच अन्य धार्मिक मजकूर नसल्याची खात्री करून घेतल्यावर व माझे तसे समाधान झाल्यावर त्या ग्रंथपट्ट्यांचे अचूक वय शोधण्याची माझी इच्छा होती. नाडी ग्रंथपट्ट्यां-सारख्या जैविक घटकांचे वय शोधण्या-साठी सी (कार्बन) १४ कसोटी (टेस्ट) करावी लागते याची मला कल्पना होती. (यानंतर लेखक कार्बन कसोटी कशी करतात याची सविस्तर माहिती देतात. गेल्या २०-२५ वर्षात या कसोटीत अनेक सुधारणा झाल्याचे नमूद करतात.) जर्मनीत रॉझेनडॉर्फ येथील 'न्युक्लिअर रिसर्च सेंटरच्या आयन रेडिएशन फिजिक्स इन्स्टिट्यूट' मध्ये सॅक्सेन नॅशनल आर्ट गॅलरीतील राष्ट्रीय महत्त्वाच्या पेंटिंग मटेरियलचे व ऑर्कियॉलॉजिकल शोधवस्तूंचे वय ठरवण्याचे महत्त्वाचे काम केले जाते.

या कामासाठी मी तेथील इन्स्टिट्यूट फॉर आयन-रेडिएशन-फिजिक्समधील दोन तज्ज्ञ शास्त्रज्ञांची मदत मिळवली. त्यांची नावे होती - डॉ. फ्रेड्रिक आणि डॉ. हंसे. त्यांचा मी हार्दिक ऋणी आहे कारण त्यांच्याशिवाय हे काम सरकारी खात्याच्या दिरंगाईत फसून बसले असते. त्यांनी नाडी ग्रंथपट्ट्यांचे निरीक्षण करून असे सांगितले की या ३५ सें. मी. लांब व ५ सें. मी. रुंद पट्ट्यांवरील मजकूर शाईने लिहिलेला नसून तो ब्रॉन्झ किंवा लोखंडासारख्या धातूच्या सुईसारख्या तीक्ष्ण लेखणीने कोरलेला आहे. त्याशिवाय कोरलेले लिखाण नीट वाचता यावे यासाठी त्यावर ग्राफाईटसारखी बारीक काळी पावडर पसरली आहे. त्यामुळे एक समस्या आहे की ती काळी कार्बन पावडर आधी संपूर्णपणे काढून टाकावी लागेल. त्याशिवाय नाडी ग्रंथपट्ट्यांचे सूर्यप्रकाशापासून रक्षण व्हावे यासाठी दोन लाकडी पट्ट्यात दीर्घकाळपर्यंत दोरीने करकचून बांधून बंद होत्या, लेखक थॉमस रिटर म्हणतात, वाईट वाटले पण वाट पाहण्याशिवाय पर्याय नव्हता. पुढे १९९५ सालचा मार्च महिना उगवला तेव्हा माझ्या हातात अंतिम रिपोर्ट पडला. त्यात स्पष्ट म्हटले होते, 'माझ्या अवळील नाडी ग्रंथपट्टीचे आयुष्यमान कमीत कमी ३५० वर्षांचे होते. त्यात अशा शोधकामात दिली

जाणारी सूट लक्षात घेता नाडी पट्टीचे वय ३५० ते ४०० वर्षे इतके प्राचीन असावे असे ठामपणे सिद्ध होते. त्यावरून माझी खात्री झाली की इन्स्टिट्यूट फॉर आयन-रेडिएशन-फिजिक्स, दि न्युक्लिअर रिसर्च सेंटर रोझेनडॉर्फ सॅकसेन जर्मनीमध्ये केलेल्या परीक्षणातील नाडी ग्रंथपट्टीवर ज्या कोणा व्यक्तीने तो मजकूर लिहिला होता तो कमीतकमी ३५० वर्षांपूर्वी लिहिला गेला होता की ज्याचे वाचन श्री. रमणी (गुरुजी) नी करून मला अर्थ सांगितला.

आता जर्मनीसारख्या देशातून येऊन, नाडी ग्रंथपट्ट्यांचे अवलोकन करून, त्यांचे सॅम्पल मिळवून न्युक्लिअर रिसर्च सेंटर रोझेनडॉर्फ सारख्या विख्यात प्रयोगशाळेतून कार्बन १४ कसोटीचा रिपोर्ट मिळवून तो प्रसिद्ध करणे हे कष्ट घेणारे थॉमस रिटर कुठे आणि महाराष्ट्रात घरबसल्या नाडी ग्रंथांना थोतांड म्हणून हिणवणारे भारतीय अंनिस कुठे !

महाराष्ट्र अंनिसतर्फे लिहिल्या गेलेल्या "दैववादाची होळी" या पुस्तकात पान १५७ वर नाडी ग्रंथ भविष्याला व पर्यायाने मला दिलेल्या आव्हानाच्या संदर्भात अंनिसचे कार्यवाह अध्यक्ष म्हणतात, "श्री. ओक नाडी ग्रंथ भविष्याकडे वैज्ञानिक दृष्टिकोणातून पाहात असल्यामुळे संबंधित नाडी ग्रंथांची काही पाने वा त्याचे छोटे तुकडे श्री. ओक यांनी रेडिओ कार्बन चाचणीसाठी मिळवून देण्याची व्यवस्था करावी. ही चाचणी आता जगात खूप अचूक बनली असल्यामुळे संबंधित पानाचे वय अचूक कळू शकेल. ते अलिकडचे शे-पाचशे वर्षातील निघाले तर सर्वच ग्रंथ ही एका क्षणात फसवेगिरी ठरते."

नाडी ग्रंथ भविष्याला 'क्षणात थोतांड' जाहीर करण्यासाठी कार्बन-१४ कसोटीची इतकी सोपी युक्ती माहीत असताना अंनिस माझ्यावर विसंबून नाडी ग्रंथपट्ट्यांच्या तुकड्यांसाठी खोळंबून बसते यावरून त्यांना नाडी ग्रंथ भविष्याची कसोटी कसेही व काही तरी करून टाळायची आहे असे सिद्ध होते.

अंनिसचे वर उल्लेखलेले विधान की नाडी ग्रंथपट्ट्यांचे "ते (आयुष्य) अलिकडचे शे-पाचशे वर्षातील निघाले तर सर्वच ग्रंथ ही एका क्षणात फसवेगिरी ठरते." ही त्यांनी काढलेली मखलाशीपूर्ण शाब्दिक पळवाट आहे. नाडी ग्रंथपट्ट्यातील मजकुरात व्यक्तीचे व त्याच्या संबंधितांची नावे त्याने नाडीपट्टी पाहण्याच्या वा नाडी केंद्राला भेट देण्याच्या आधी कधीही लिहून तयार असतील तर - मग ती १०० वर्षे किंवा ३५० वा ५०० वा ५००० वर्षांपूर्वी अशी कितीही वर्षापूर्वी लिहिलेली असली तर तो नक्कीच चमत्कार ठरतो, फसवेगिरी नाही.

जर एक परदेशी व्यक्ती नाडी ग्रंथपट्ट्यांवर शोधकार्य करू शकते तर महाराष्ट्र अंनिस जी लाखो रुपयांचे बक्षीस देण्याचे आव्हान देऊन बसलेली आहे, आणि श्री. बी. प्रेमानंद यासारख्यांनी ओकांवर न विसंबता स्वतंत्रपणे कार्बन १४ कसोटी करून आपला निष्कर्ष लोकांसमोर ठेवावा.

## बडोद्याचे नाडीभक्त श्री. निलेश त्रिवेदी

सहजानंद उद्योजक समूहाचे प्रवर्तक श्री. निलेश भाईंनी स्वतःचे नाडी भविष्य अनुभवल्यावर आपल्या गुजराती मित्र परिवारातील सर्वांना नाडी भविष्य पाहायला लावले. त्यांच्या मार्ग-दर्शनाखाली बडोद्यात नाडी वाचक श्री. कौशिकन यांनी अगस्त्य नाडी केंद्राची स्थापना करून अहमदाबाद व वणकपुरी येथें केंद्राच्या शाखा काढल्या. आज पर्यंत हजारो नाडी कथनांचे गुजराथी मधून भाषांतर त्यांनी केले आहे. दादरच्या धुरू हॉलमध्ये नाडी भविष्यावर त्यांनी केलेल्या भाषणातील अनेक किस्सांना प्रचंड टाळ्यांचा प्रतिसाद मिळाला. महर्षींची अत्यंतिक भक्तिभावाने सेवा करण्याचे कार्य त्यांना स्वामी नारायणांच्या कृपाप्रसादाने मिळालेले आहे अशी त्यांची दृढ श्रद्धा आहे. सन २००८ मध्ये नाडी ग्रंथ भविष्यावर पुस्तक पुढचे प्रसिद्ध करण्यास त्यांचा पुढाकार आहे.

प्रकरण १५

# नाडी ग्रंथातील जनरल (नं. १) कांडातील एका जपानी व्यक्तीच्या भविष्याचा नमुना

**(नाडी ग्रंथ भविष्याची पट्टी सापडल्यानंतर नंबर १ किंवा जनरल कांडातून, तसेच १३ (शांती) व १४ (परिहार) कांडां-मधून मिळणाऱ्या माहितीचे स्वरूप कसे असते याची कल्पना येण्यासाठी सोबत एका जपानी व्यक्तीच्या नाडी ग्रंथ भविष्य पट्टीतील कॅसेटमधील इंटरनेटवरून मिळवलेल्या मजकुराचा मराठी अनुवाद देत आहे. श्री. नोरिहितो ओकाडा यांच्या इंग्रजीमधील अनुवादित भविष्यावरून नाडीभविष्य प्रथम पाहणाऱ्यांना साधारणतः भविष्य कसे मिळेल याची कल्पना या नमुन्यावरून यावी ही अपेक्षा.)**

**प्रथम किंवा जनरल कांडमचा नमुना**

**(सुरुवातीला नाडी केंद्राचे नाव, पत्ता, रेकॉर्डिंगची तारीख, नाडी-वाचकाचे नाव याचा उल्लेख करण्याचा संकेत आहे. त्यानंतर नाडीपट्टीतील मजकूर ज्या वहीत काढलेला असतो त्या वहीतील श्लोकाच्या ओळी वाचून साध्या तमिळमध्ये अर्थ सांगितला जातो. त्याच्या भाषांतरासह सर्व टेप केले जाते.)**

श्री. नोरिहितो ओकाडा (Norihito Okada) भृगु तुल्य नाडी.

भृगुमहर्षी मुखाला नमन करून या जातकाचे भविष्यकथन करतात. तुझ्या उजव्या अंगठ्याच्या ठशाचे वर्णन ओरू सूत्री, वत्त रेखै, आणि दोन टिंबे आहेत. तमिळ पंचांगाप्रमाणे तुझा जन्म कीलक वरुणम (सन १९६८-१९६९) सितिरैचैत्रमासम हानिवारम तमिळ तिथी १६ अर्थात २४ एप्रिल १९६८ असा जन्म दिनांक सांगतात. (ग्रहस्थिती जपानी मधून ट्रान्सलेट नीट करता न आल्याने कळली नाही) तू सच्चरित्र, उच्च विचारांचा व कलागुणी आहेस.

तू विवाहित आहेस. मुलगा व मुलगी अशी २ अपत्ये आहेत. तुझ्या पत्नीला तुझ्याशी विवाह करण्याआधी तिच्या प्रियकरापासून २ मुले आहेत. तिला एकूण २ अपत्ये आहेत. ती तुझ्यापेक्षा वयाने मोठी आहे. तू ज्योतिषाचा धंदा करून त्यातून कमिशन मिळवतोस. पूर्वापारची संपत्ती वाट्याला आलेली नाही. सध्या तू भाड्याच्या घरात राहतोस. तुझे नाव नोरिहिटो ओकाडा, वडिलांचे नाव योटो (Ryota) आईचे नाव मायुमी (Mayumi) आणि पत्नीचे नाव (Keiko) केईको. तू हे भविष्य कथन वयाच्या ३७ व्या पाहत आहेस. सध्या तुझे आई-वडील विभक्त राहतात.

पूर्वजन्मातील दुष्कृत्यांमुळे काही त्रास व निराशा, कष्ट संभवतात. त्यासाठी १३ व १४ कांडातील शांतीदीक्षा करावी. त्याच्या प्रभावाने जीवन सुरळीत जाईल.

वयाच्या ३७ ते ३९ वर्षात हळूहळू बदल घडत जीवनाला आकार मिळेल. या काळात धंदा चांगला चालून पत्नी मुलांसह आरामाचे जीवन जगाल. या काळात फिल्मजगताशी संबंधित कामामुळे पैसा व उच्चभ्रूलोकांशी मैत्री होईल. ३९ ते ४५ वर्षात मुले शिक्षण संपवतील. देवदयेने तुझ्या धंद्यात तुझे नाव होईल. याच काळात आईची तब्येत बिघडेल. ती बरी होता होता वडिलांच्या औषधोपचारावर पाण्या-सारखा पैसा वाहेल. तथापि त्या दोघांना देवदयेने बरे वाटेल. ४५, ४६, ४७ वर्षांत मुले टेक्निकल साइडला उच्चशिक्षण घेतील. ४८ ते ५० वर्षांत काही अनामिक भीतीने मन अस्वस्थ राहील. ५० ते ५४ पर्यंत वडिलांचा मृत्यू होईल. भावाबरोबर, त्यांचा अंत्यविधी करावा लागेल. आईची जन्मभर काळजी घेण्याची जबाबदारी येईल. तोपर्यंत मुलांमुलींची लग्ने होऊन ते आनंदात राहतील. ५८-६२ पर्यंत आईचे सुख राहील. ७५ व त्यापुढे जीवन आहे. एकूण आनंदाचे, सुखी व ऐषारामी जीवन जाईल. जीवनात अनेक धार्मिक स्थळांना भेट देण्याची संधी मिळेल.

शुभम्

# नाडी शांती (नं. १३) कांडातील भविष्याचा नमुना

(नाडी ग्रंथ भविष्याच्या प्रथम कांडात म्हणतात की जातकाच्या सध्याच्या कष्टमय जीवनाला कारणीभूत त्याची पूर्वजन्माची पापे आहेत. त्या पापांचे प्रायश्चित्त केले नाही तर जीवनात त्यांचा उपसर्ग वाढेल. सर्वसाधारणपणे जो नाडी भविष्य पाहतो तो शांती-दीक्षा करण्यास उत्सुक असतो. नाडीपट्टीत सुचवलेल्या मंदिरात जाऊन पूजा-अर्चना करणे, गरीब अपंगांना दान-दक्षिणा देऊन त्यांचे शुभाशीर्वाद मिळवायला सांगितले जाते. त्यानंतर नाडी केंद्रात जाऊन नाडी शास्त्रींनी पट्टीत सुचवलेली दान-दक्षिणा करायची असते. परिहार करणे किंवा न करणे सर्वस्वी आपल्या हातात आहे. मात्र करायचा असेल तर मनःपूर्वक व विधि, नियमांनी करावी. **पंजाबातील सुधार गावाच्या श्री. सुरेशकुमार यांच्या १३ कांडाच्या नमुन्यातून वाचकांना या कांडाच्या रचनेची कल्पना येईल.)**

ॐ नमो नारायणाय. महर्षी अगस्त्य भगवान शंकरांच्या पायांना स्पर्शून शांती कांडाचे वर्णन करत आहेत. कर्क राशीत जन्मलेल्या या जातकाचे नाव सुरेशकुमार आहे. वडिलांचे नाव लक्ष्मणदास व आईचे नाव लाजवंती आहे. तुझा जन्म तमिळ पंचांगाप्रमाणे अश्विन महिन्यात, पुनर्वसू नक्षत्रात झाला. जातक आधीच्या अनेक जन्मांपैकी एका जन्मात क्षत्रिय कुटुंबात जन्मला. त्या जन्मात त्याने अनेकांना छळले. नाडले. माता-पित्याला छळले. अहंकारीपणा, दारू, जुगार कारणांनी लोकांना लुटले. गुरुजन व वरिष्ठांचा योग्य मान राखला नाही. त्यामुळे अनेक त्रास भोगावे लागले. त्या जीवनात म्हातारपणी उपरती होऊन पुण्यकार्य केले त्यामुळे हा नरदेह प्राप्त झाला. या आयुष्यात जीवनात त्रास व क्लेषांतून वाचायचे असेल तर या कांडातून सुचवलेले परिहार करावेत. जे असे आहेत - प्रथम एका शुक्रवारी गणेश मंदिरात जाऊन गणपतीच्या मूर्तीला अभिषेक करून वस्त्रे घालावीत. नंतर एक दीप लावून एक प्रदक्षिणा घालावी. एक प्रदक्षिणा घालावी. त्यानंतर जितक्यांना शक्य असेल तितक्या अपंग, गरिबांना पोटभर जेवण द्यावे. त्या गणपतीच्या पूजेनंतर नाडी शास्त्रींना केंद्रात ३ तऱ्हेच्या मिठाया, ३ तऱ्हेची फळे व फुले, ३ काश्याच्या लोट्यात ३ तऱ्हेचे धान्य भरून एका शेंडीवाल्या नारळासह साडी-चोळी, शर्ट, धोतरलुंगी अर्पण करावी. नंतर आपल्या वयाच्या ४८ पट रुपये (जे १८७२ होतात) गुरुदान करावेत. त्यानंतर १२ ज्योतिर्लिंगांपैकी कोणत्याही एका मंदिरात जाऊन भगवान शंकरावर अभिषेक करावा. वस्त्र देऊन ४८ दीप लावावेत. एक परिक्रमा करून ४८ गरिबांना वस्त्र व अन्नदान करून त्या दिवशी संध्याकाळी ४.३० ते ६ च्या दरम्यान जाऊन एक दीप लावावा. असे कमीतकमी ४८ रविवार करावे. हे परिहार विधान मनोभावे केले तर पूर्व पापे नष्ट होऊन उर्वरित आयुष्य सुखी जाण्यास मदत होईल.

***

> **'श्रद्धावंत थोर कॉम्प्यूटर तज्ज्ञ नाडीप्रेमी डॉ. विजय भटकर'**

आपले पुरोगामित्व सिद्ध करण्या-साठी आजकालच्या शास्त्रज्ञ मंडळींना भविष्यकथन पद्धतीस नाकारून मोठी सोय झाली आहे. विद्यापीठातून त्या विषयाला मान्यता मिळू नये म्हणून अत्यंत तिडिकीने आटापिटा करण्यात अनेकांनी आपली शक्ती दवडली. 'ज्योतिष हे शास्त्र कसे नाही' हे भविष्य विरोधकांना छान रंगवून सांगता येते. त्या मानाने तर्काने या अन्य पद्धतीने पटवून देण्यात त्यांचे विरोधक कमी पडतात. अशा परिस्थितीत एक वैज्ञानिक असूनही कॉम्प्यूटर तज्ज्ञ डॉ. विजय भटकर वेळोवेळी भविष्यवादी व अध्यात्मवाद्यांच्या बाजूने धाऊन आतात. नाडी भविष्याच्या संदर्भात आधुनिक साधनांचा वापर करून ते जास्त लोकांच्या पर्यंत कसे पोचेल याबाबतच्या शोधकार्यात त्यांनी वेळोवेळी मार्गदर्शन केले आहे. डॉ. जयंत नारळीकरांसमावेत नाडीग्रंथांची शास्त्रीय कसोटी घेण्याची तयारी दर्शवली आहे.

# नाडी ग्रंथातील दीक्षा कांडातील (नंबर १४) भविष्याचा नमुना

ॐ नमो नारायणाय. महर्षी अगस्त्य भगवान शिवांना नमन करून दीक्षा कांडाचे वर्णन करत आहेत. कर्क राशीत जन्मलेल्या या जातकाचे नाव सुरेशकुमार आहे. वडिलांचे नाव लक्ष्मणदास व आईचे नाव लाजवंती आहे. तुझा जन्म तमिळ पंचांगाप्रमाणे अश्विन महिन्यात, पुनर्वसू नक्षत्रात झाला.

सध्या तुझ्या कुटुंबावर तुझा उत्कर्ष सहन न होणाऱ्या दुष्ट वृत्तीच्या लोकांच्या जादूटोण्याच्या वाईट कारवाया चालू असून त्या कारणाने घरात कटकटी, त्रास व वैताग होईल. कुटुंबातील कोणी ना कोणी सतत आजारी पडून त्यावर पाण्यासारखा पैसा खर्च होणार आहे. मन उद्विग्न व उदास राहील. घरात अनेक उपद्रव चालू राहतील. या सगळ्यावर मात करण्यासाठी शिवाचा पंचाक्षरी 'ॐ नमः शिवाय' मंत्राचा १०८ माळा जप दररोज सतत ४८ दिवसाचे एक असे ३ मंडले (१४४ दिवस) करणे आवश्यक. मंत्र एका जागेवर बसून, एकाच वेळी, शिवाचा फोटो समोर ठेवून नारळ, फुलाचा हार व पूजेचे अन्य साहित्य घेऊन करावा. (पण दररोजच्या व्यस्त कार्यक्रमामुळे स्वतःला तो करणे शक्य होत नसेल तर नाडी केंद्रामार्फत तो करण्याची सोय केली जाते. त्यासाठी रोजचे १० ते २५ रुपये घेतले जातात. पूजासामान व जप करणाऱ्याचा मेहनताना विचारात घेता ही रक्कम अवाजवी वाटत नाही. केंद्रात पैसे जमा केले की मंडलांची पूजा व जप झाला की पोस्टाने मंत्रित तावीज पाठवला जातो.) तो तावीज जातकाने शरीरावर धारण करणे आवश्यक आहे. त्या आधी घरातील देवांबरोबर पूजा करून, चांगला मुहूर्त पाहून, तो गळ्यात वा दंडावर धारण करावा. उरलेली रक्षा जपून ठेवावी. कधी तावीज हरवला, वापरून खराब झाला तर चांदीच्या पेटीत उरलेल्या रक्षेतील थोडी रक्षा भरून नवा तावीज धारण करावा. त्यामुळे जीवनातील कटकटी दूर होण्यास मदत होईल. जीवनात इच्छित शांतता लाभून मन संतुष्ट राहील. याबरोबर दीक्षाकांडाची समाप्ती होत आहे. शुभम्.

---

**'शास्त्रीय दृष्टिकोनातून शोध करणारे ऋषितुल्य सत्यनिष्ठ वैज्ञानिक श्री. अद्वयानंद गळतगे !'**

निवृत्त प्राचार्य अद्वयानंद गळतगे (सन २००७ मध्ये) जवळजवळ ७० वर्षांचे आहेत. पदार्थविज्ञान, मनोविज्ञान, परामानस शास्त्र, तत्त्वज्ञान, अध्यात्म-शास्त्र आदि विषयांवरील त्यांचे लेख-पुस्तके तज्ज्ञांमध्ये एक चर्चेचे विषय आहेत. त्यांची व माझी नाडीभविष्याच्या कारणाने भेट झाल्यावर ते स्वतः माझ्या बरोबर चेन्नईला दूरवर नाडीकेंद्रांना भेट देऊन नाडी भविष्याची कसोटी घेऊन आले. कोणतीही गोष्ट पारखल्याशिवाय न मानणाऱ्या अद्वयानंदांनी नाडी पट्टीत जेव्हा लिहिलेले पाहिले की ते 'शशिकांत' नामक व्यक्ती बरोबर नाडी भविष्याची शास्त्रीय कसोटी करण्या-साठी आलेले आहेत. तेव्हा ते अचंबित झाले. त्यांच्या पट्ट्यांचे फोटो घेतले गेले. त्यांत संबंधितांची नावे व अन्य स्पष्ट उल्लेखांच्या प्रत्येक शब्दाचा अर्थ काढून त्यांनी खात्री करून घेतली. त्यापैकी एका विस्तारीत फोटोमधील दोन ओळी ज्यामधे 'शशिकांत' ही अक्षरे कोरली आहेत तो व अन्य एक फोटो मलपृष्ठावर प्रथमच प्रसिद्ध होत आहे. त्यांनी लिहिलेल्या 'विज्ञान आणि बुद्धिवाद', 'विज्ञान आणि अंधश्रद्धा निर्मूलन' पुस्तके वाचून त्यांच्या प्रकांड पांडित्याची व विद्वत्तेची ओळख होते, त्यांचे विचार या पुस्तकात आहेतच शिवाय डॉ. जयंत नारळीकरांना लिहिलेली ५ पत्रे आपल्याला माझ्या इंग्रजी पुस्तकात वाचायला मिळतील.

**

प्रकरण १८ **महाराष्ट्रातील नाडी केंद्रांचे पत्ते**

**नाडी केंद्रांचे पत्ते, फोन नंबर वरचेवर बदलत राहतात, फीमध्ये बदल होतात याची वाचकांनी नोंद घ्यावी. नाडी ग्रंथ प्रेमींनी नव्याने स्थापल्या जाणाऱ्या, बदललेल्या पत्त्यांची माहिती आवर्जून पाठवावी. दि. ३१ डिसेंबर २००७ पर्यंतचे नवीनतम पत्ते**

| क्र. | नाडी शास्त्रींचे नाव व नाडीग्रंथ | पत्ता व फोन नंबर | फी व इतर माहिती |
|---|---|---|---|
| | **पुणे** | | |
| | **विमाननगर** | | |
| १. | अगस्त्य महाशिव तुल्य नाडी केंद्र. नाडी शास्त्री - श्री. शिव षण्मुगम. | २१/३-१. बेला विस्टा, गणपती चौकाजवळ विमाननगर, पुणे-४११ ०१४. सोमवारी बंद फोन -(०२०) ६५२७ ३४१० मो. - ९८२३०७५९३८ जाने २००८ पासून रोहाऊस नं. ३ मंत्री मॅनोर, लेन नं. ५ कवडेवाडी नार्थ मेन रोड, कोरेगाव-पार्क भागात हे केंद्र स्थलांतरित होणार आहे. | फी - जनरल कांडम रु. ६२५ अन्य कांडम - रु. ३०० मराठी हिंदीतून भाषांतराची सोय आहे. मागणी केल्यास काक भुजंडर, वसिष्ठ, मीनाक्षी, आदि महर्षींच्या पट्ट्या उपलब्ध केल्या जातात. |
| | **पौड रोड, कोथरुड.** | | |
| २. | श्री. अगस्त्य महाशिव नाडी केंद्र - नाडी शास्त्री- श्री. ए. एन. मुत्थ्यु सामी. | फ्लॅट १९, जे बिल्डिंग - तिसरा मजला, शंकर नगरी हौ. सो.- पौड रस्ता, कोथरुड, पुणे. ४११ ०२९. (वनाझ फॅक्टरीजवळ कॉसमॉस बँकेशेजारी) फोन - ०२० ६५००२४०३ मोबाईल - ९८२३०९७००२. सोमवारी बंद | फी - रु. ४०० जनरल कांडम रु. ४०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय आहे. |
| | **डहाणूकर कॉलनी,** | | |
| ३. | श्री. अगस्त्य महाशिव तुल्य नाडी केंद्र - | फ्लॅट ११-ए, वैष्णवी अपार्टमेंटस्, प्लॉट नं. ६८, आठवी लेन डहाणूकर कॉलनी कोथरूड पुणे. ४११ ०५२ संपर्क - श्री. वडिवेल मुदलियार फोन -(०२०) २५३९ ५९४९ मोबाईल - ९४२३० ८८५०६. सोमवारी बंद | फी - रु. ४०० जनरल कांडम रु. ४०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय आहे. |

| क्र. | नाडी शास्त्रींचे नाव व नाडीग्रंथ | पत्ता व फोन नंबर | फी व इतर माहिती |
|---|---|---|---|
| | **चिंचवड.** | | |
| ४. | कौशिक अगस्त्य नाडी केंद्र- नाडी केंद्र चालक - श्री. ईश्वरन. | लक्ष्मीतारा कॉम्प्लेक्स, दुसरा मजला, डांगे चौक, थेरगाव, चिंचवड. पुणे. ४११ ०३३. मो.- ९४२२५ ७८०९९.,९३२२७ ९०८३९. # महर्षी अत्रींची अद्भूत जीव नाडी (प्रश्नकांडम) या केंद्रात उपलब्ध. सोमवारी बंद संपर्क श्री. पशुपती - फोन - (०२०) २७२७४७४२. | फी - रु. ४०० जनरल कांडम रु. ४०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय आहे. महर्षींनी आशीर्वादलेले व गौरवलेले संख्याकुंडलीकार श्री. राजन वैद्य या केंद्रात भेटू शकतात. मो.९८५०० ४८९७१ |
| | **वडगाव बुद्रुक. (सिंहगड रस्ता)** | | |
| ५. | सप्तर्षी, अगस्त्य वसिष्ठ नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. सर्वेश्वरन श्री. अशोक कुमार. | बिल्डिंग नं. ए, फ्लॅट नं. १३, अक्षय अपार्टमेंट - पहिला मजला, आनंदनगर सिंहगड रस्ता, पुणे. ४११ ०५१. (हीरो होंडा सर्व्हिसिंग स्टेशनच्या गल्लीत वळावे) सोमवारी बंद फोन - (०२०) २४३५३०१८. मो. ९८९०७ २६६९८. | फी - रु. ४०० जनरल कांडम रु. ३५० कांडांसाठी, मराठीतून भाषांतराची सोय नाही. |
| | **विश्रांतवाडी.** | | |
| ६. | अगस्त्य नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. मुरलीधरन. | प्लॉट नं. १९ - संतोषनगर, आळंदी मार्गावर, विश्रांतवाडी ते टिंगरे नगर रस्त्यावरील सावंत पेट्रोल पंपामागील गल्लीत, शेवटचे टोक, पुणे. ४११ ०१५. फोन - (०२०) २७१७१९९९ मो. ९४२३२ ४७४७७ मंगळवारी बंद | फी - रु. ३०० जनरल कांडम रु. २०० अन्य कांडांसाठी, मराठीतून भाषांतराची सोय नाही. वेळ - १० ते ६ |
| | **बिबवेवाडी.** | | |
| ७. | वसिष्ठ महाशिव तुल्य नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. सदाशिव सामी व श्री. अरविंद सामी. | जनता सहकारी सो. - नं. १. वसुधा बंगला बिबवेवाडी. पुणे. ४११ ०३७. (चंद्रलोक हॉस्पिटलजवळ) फोन - (०२०) २४२१५५५४. सोमवारी बंद. | फी - रु. ५०० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी, मराठीतून भाषांतराची सोय नाही. |

| क्र. | नाडी शास्त्रींचे नाव व नाडीग्रंथ | पत्ता व फोन नंबर | फी व इतर माहिती |
|---|---|---|---|
| | **परिहार चौक, औंध.** | | |
| ८. | अगस्त्य महाशिव तुल्य नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. एम. पी. बाला सामी. | फ्लॅट नं. - १४, तिसरा मजला, हृषिकेश धाम नं. २, डी. पी. रोड, परिहार चौक, औंध, पुणे - ४११ ००७. फोन - ०२०-२५८९७७८४. मोबाईल - ९४२२००९३३४. सोमवारी बंद. | फी - रु. ५२५ जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय आहे. |
| | **औंध.** | | |
| ९. | अगस्त्य महाशिव सूक्ष्म नाडी केंद्र - नाडी केंद्र चालक - श्री. बालाजी. | बालाजी निवास, डॉ. आंबेडकर चौक, पहिला मजला, बंगलोर स्वीटमार्टच्यावर, औंध टेलीफोन एक्स्चेंजजवळ, डी. पी. रोड, औंध. पुणे. ७. मो. - श्री. बालाजी ९८५०६७७४१४ अपॉईंटमेंटसाठी संपर्क श्री. सुरेश पंडित. मोबाईल - ९४२३२ ४४१२५. सोमवारी बंद. | फी - रु. ५०० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय आहे. (हे केंद्र सध्या बंद आहे) |
| | **कळस आळंदीरस्ता** | | |
| १० | श्री. अगस्त्य नाडी केंद्र श्री. टी. बालमुरली | शॉप नं. २१. डिफेन्स आर अँड डी हौ. सोसायटी पठाणशाह दर्यासमोर, आळंदी रोड कळस, पुणे ४११ ०१५. मो.- ९२२६७ ११४०७ | फी - जनरल कांडम रु. ४०० अन्य कांडम - रु. ३०० हिंदीतून भाषांतराची सोय आहे. (नवा पत्ता) |

| क्र. | नाडी शास्त्रींचे नाव व नाडीग्रंथ | पत्ता व फोन नंबर | फी व इतर माहिती |
|---|---|---|---|
| | **मुंबई** | | |
| | **डोंबिवली, पश्चिम.** | | |
| १. | अगस्त्य नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. ए. एन. मुरुगेशन. | फ्लॅट नं. ३०१ व ४०३, (तोरल) हरिहर अपार्टमेंट्स, तिसरा व चौथा मजला, डोंबिवली (पश्चिम). ४२१ २०१. (म्युनिसिपल हॉस्पिटल मागे) फोन - ०२५-२४८४७९०, २२१२३९६. मोबाईल - ९८२१३ ०७१९३, ९८२०८७२८३४ सोमवारी बंद. | फी - रु. ४०० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. |
| | **ठाणे, पश्चिम.** | | |
| २. | अगस्त्य महाशिव नाडी केंद्र- नाडी शास्त्री - श्री. व्ही. जी. सेल्वकुमारन व श्री. एन. बालाजी. | १०४, ओशो अष्ट विनायक हौ. सो. पहिला मजला, (बी केबीन रस्ता, प्लॅटफॉर्म क्रमांक एकच्या मागील रस्त्याने दोन मिनिटांच्या अंतरावर) शिवाजी नगर, नौपाडा, ठाणे. ४०० ६०२. फोन - (०२२) २५३९६८४७. मो. - ९८९२१ ५४९७६ (सेल्वकुमार), ९८२१३ ७२८६४. (एन बालाजी) सोमवारी बंद. | फी - रु. ४०० जनरल कांडम रु. ४०० अन्य कांडांसाठी. हिंदीतून भाषांतराची सोय नाही. |
| ३. | अगस्त्य नाडी केंद्र- नाडी शास्त्री - श्री. एस. राजेन्द्रन | २०३, अष्टविनायक कृपा अपार्टमेंट्स, भक्ती मंदीर रोड, हरीनिवास सर्कल जवळ, ठाणे. (पश्चिम) फोन - (०२२) २५३८ १२३३. मो. - ९८३३१ ४१८१९. | फी - रु. ४०० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. (नवा पत्ता) |
| | **चेंबूर.** | | |
| ४. | अगस्त्य नाडी केंद्र - नाडी शास्त्री-श्री. मणिकंदन. | २११, सम्राट भवन, मुरुगन मंदिरासमोर, छेडानगर, चेंबूर, मुंबई. ४०० ०७५. फोन - (०२२) २५२८ ०३८८. मोबाईल - ९८२०५७६३१६. सोमवारी बंद. | फी - रु. ३०० जनरल कांडम रु. २०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय आहे. (सध्या केंद्र बंद आहे) |

| क्र. | नाडी शास्त्रींचे नाव व नाडीग्रंथ | पत्ता व फोन नंबर | फी व इतर माहिती |
|---|---|---|---|
| | **वाशी, नवी मुंबई.** | | |
| ५. | अगस्त्य महाशिव नाडी केंद्र- नाडी शास्त्री - श्री. कुमरेशन. | रूम नं. ६, बी टाईप बिल्डिंग नं. - ४. तळमजला, सेक्टर - ६. वाशी. नवी मुंबई. ४०० ७०३. फोन - (०२२) २७८२ ०१००. मोबाईल -९८२११२०४३४६ सोमवारी बंद. | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठी हिंदीतून भाषांतराची सोय आहे. |
| | **वाशी मुंबई** | | |
| ६. | कार्तिक कुमार | बिल्डींग नं सी -१ ए रूम नं. २. सेक्टर - ८ सुर्योदय सोसायटी, महात्मा स्कूल-जवळ, खांदा कॉलनी नवे पनवेल, नवी मुंबई फोन - (०२२७२) ६५११५७५७ मो. - ९८६७२ ५७५०९ | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठी हिंदीतून भाषांतराची सोय आहे. |
| | **नेरुळ, नवी मुंबई.** | | |
| ७. | अगस्त्य महाशिव नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. अरूल सामी. | रूम नं. १, फ्लॅट नं. १७, एन एल- बी टाईप बिल्डिंग नं.- ५. सेक्टर - ३. नेरुळ. नवी मुंबई ४०० ७०६. फोन - (०२२) २७७१ १९१४. मो. ९८१९३ १३७७६. सोमवारी बंद. | फी - रु. ४०० जनरल कांडम रु. १५० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. |
| | **नेरुळ, पूर्व,** | | |
| ८. | अगस्त्य नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. बाला सामी. (यांचे पुण्यातही केंद्र आहे) | प्लॉट नं. १९, फ्लॅट नं. ए - ३ सेक्टर-१७ रामतनु सोसा., व्हाईट हाऊससमोर. नेरुळ. (पूर्व) नवी मुंबई ४०० ७०६ फोन - (०२२) २७७१ ७३९५. सोमवारी बंद. | फी - रु. ५२५ जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. |
| | **सांताक्रूज (पूर्व)** | | |
| ९. | वसिष्ठ महाशिव नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. मुरुगेशन. | बिल्डिंग नं.-१९/१५१, पहिला मजला, जुने आनंदनगर, सायला कॉम्प्युटर्स. सांताक्रूज वाकोला ब्रिज बसस्टॉपजवळ (पूर्व) मुंबई. ४०००५५. फोन- ०२२-२६६८१६४२,२६६८१०२३ | फी - रु. ५०० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. सोमवारी बंद. |

| क्र. | नाडी शास्त्रींचे नाव व नाडीग्रंथ | पत्ता व फोन नंबर | फी व इतर माहिती |
|---|---|---|---|
| | **सांताक्रूज (पूर्व)** | | |
| १०. | कौशिक वसिष्ठ महाशिव नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. बी. सुभाष | २५-२००, बिल्डींग, तळमजला, आनंद नगर, नेहरू रोड, ओम इस्टेटच्या मागे, वाकोला ब्रिज सांताक्रूझ (पूर्व) मुंबई ४०० ०५५ फोन - (०२२) ६५३९ ६६८० मो. ९८६७६६३२५०, ९८३३०६५६७६ | फी - रु. ३०० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय आहे. |
| ११. | **मुलुंड, (पूर्व)** | | |
| | अगस्त्य वसिष्ठ महाशिव नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. आर. के. मणिराजन. | फ्लॅट नं. १०१, महावीर दर्शन बिल्डिंग, पहिला मजला, लोकमान्य टिळक रोड, मुलुंड (पूर्व). ४००००१. (गुर्जर मॅटर्निटी हॉस्पिटल समोर, रेल्वे स्टेशन जवळ) फोन - (०२२) ६४१२६०३१, ३२४२३८३९, २१६३६५४६ मो. ९८२१३ ८२३१४ सोमवारी बंद. | फी - रु. ३०० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही |
| १२. | **सायन, पूर्व,** | | |
| | अगस्त्य महाशिव नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. डॉ. के करुणाकरन. | फ्लॅट नं. १२३, श्री शुभकर्म हौ. सोसायटी बारावा मजला, SSS नगर, षण्मुखानंद हॉल जवळ, सायन (पूर्व). ४०० ०३७ फोन - (०२२) २४०१ ३४८४. सोमवारी बंद. | फी - रु. ३०० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही |
| १३. | **चेंबूर.** | | |
| | अगस्त्य सप्तर्षि नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. एम आर. रवि | फ्लॅट नं. ४ दुसरा मजला, गायत्री अपार्टमेंट्स, कलेक्टर्स कॉलनी, आर सी एफ रोड साऊथ इंडियन बँकेच्यावर चेंबूर, मुंबई. ४०० ०७४. फोन - (०२२) ५५७९ १०८८. मो. ९३२२९ ११११. सोमवारी बंद. | फी - रु. ५०० जनरल कांडम रु. ६०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. (हे केंद्र नवीन आहे) |

| क्र. | नाडी शास्त्रींचे नाव व नाडीग्रंथ | पत्ता व फोन नंबर | फी व इतर माहिती |
|---|---|---|---|
| १४. | **डोंबिवली (पूर्व).**<br>अगस्त्य महाशिव तुल्य नाडी केंद्र-<br>नाडी केंद्र चालक -<br>श्री. कृपानंद. | मयूरा अपार्टमेंट्स, मॉडेल इंग्लिश स्कूल रोड, रामचंद्र नगर (पांडुरंग वाडी) डोंबिवली (पूर्व)<br>फोन - (२५१) २४४३०३६.<br>मो. ९३७३३ २०९२३. | फी - रु. ५०० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठी, हिंदीतून भाषांतराची सोय आहे. (पूर्वीच्या गांधीनगर भागातील केंद्राचा नवा पत्ता) |
| १५. | **ग्रांट रोड.**<br>भृगु, सूर्य संहिता केंद्र -.<br>छाया शास्त्री -<br>श्री. हर्षदभाई, रजनीभाई, अनिलभाई जोशी, स्व. बाबूभाईंचे ३ चिरंजीव. | ४१८, रावळ बिल्डिंग - दुसरा मजला, डॉ. भडमकर रस्ता, (जुना लॅमिंग्टन रोड, वाय. एम. सी. ए. बिल्डिंग शेजारी) ग्रांट रोड, मुंबई. ४०० ००४.<br>फोन-०२२-२३८२१९१६, २३८२६९८८ | फी - रु. १००१ जनरल कांडम |
| १६. | **डहाणू रोड.**<br>अगस्त्य नाडी केंद्र -<br>नाडी शास्त्री -<br>श्री. राजा | ९, श्री जी अपार्टमेंट्स. (प्रदीप पटेल यांच्या सागर लॉजपाशी चौकशी) डहाणू रोड. ४०१ ६०२.<br>फोन - (०२५२८) २२२५२५.<br>(प्रदीप पटेल यांच्या घरचा २२३२५८ व मो. ९४२२६ ८७६४८ | फी - रु. ७५० जनरल कांडम रु. ५०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. |
| १७. | **नाशिक.**<br>महाशिव सूक्ष्म नाडी केंद्र -<br>नाडी शास्त्री - श्री. पी. बाबू सामी. | चव्हाण निवास, कॅमल हाऊसच्या मागे, टाइल्स फॅक्टरी समोर, द्वारका, नाशिक. ४२२ ०११ (पूर्वीच्या गंगापूर रोडवरील केंद्राचा नवा पत्ता)<br>फोन - (०२५३) २५९६९२५.<br>मो. ९३७३९ ०५५३४ सोमवारी बंद | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. |

| क्र. | नाडी शास्त्रींचे नाव व नाडीग्रंथ | पत्ता व फोन नंबर | फी व इतर माहिती |
|---|---|---|---|
| १८. | **नाशिक.**<br>अगस्त्य, महाशिव, सप्तर्षी, पुष्ठीपाणि नाडी केंद्र - पंचवटी, नाडी शास्त्री - श्री. विजयकुमार स्वामी. | कार्तिकेय मंदिराच्याजवळ, पुजारी वाडा, शनि चौक, पंचवटी, नाशिक. ४२२ ००३<br>फोन - (०२५३) २६२१५३४,<br>मो. ९४२२७ ५९९०८.<br>सोमवारी बंद | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. |
| १९. | **नाशिक.**<br>ए. एम. शणमुगम<br>एम पी कीर्तो | बिल्डींग नं. १३, युनिट नं. ५, फ्लॅट नं. २, श्रमिक सोसायटी, माणिक नगर बस स्टॉप-समोर, गंगापूर रोड, नाशिक. ४२२ ०१३<br>फोन - (०५३) ६५३१२०७<br>मो. ९८६० ९६९१० | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठी हिंदीतून भाषांतराची सोय आहे. |
| | **जळगाव.** | | |
| २०. | अगस्त्य महाशिव नाडी केंद्र -<br>नाडी शास्त्री - श्री. कन्नन व श्री. सुंदरजी. | नवा पत्ता - ५० २, गणपती नगर, कुणाल अपार्टमेंट्सच्या बाजूला, बस स्टॅन्डजवळील हॉटेल रॉयल पॅलेसच्या समोरील रस्त्यावर, मनिषा कॉलनीच्या समोर,<br>फोन नंबर -<br>मो. ९८९०० २८०७३ (कन्नन).<br>मो. ९८९०९ ६७६३६ (सुंदरजी).<br>सोमवारी बंद | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. |
| | **धुळे.** | | |
| २१. | अगस्त्य महाशिव नाडी केंद्र -<br>नाडी शास्त्री - श्री. कन्नन व श्री. सुंदरजी. | गोविंद अपार्टमेंट, तिसरा मजला, इंदिरा गार्डनपाशी, एम. एस्. सी. बी., सर्कल ऑफीसजवळ, बस स्टॅन्डपासून २ कि.मी.<br>फोन नंबर -<br>मो. ९८९०० २८०७३ (कन्नन).<br>मो. ९८९०९ ६७६३६ (सुंदरजी).<br>सोमवारी बंद | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय आहे. |

| क्र. | नाडी शास्त्रींचे नाव व नाडीग्रंथ | पत्ता व फोन नंबर | फी व इतर माहिती |
|---|---|---|---|
| २२. | **सोलापूर**<br>महाशिव श्री अगस्त्य नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. धरणिबालन<br>नाडी केंद्र चालक - श्रीमती मल्लिका मीरा. | फ्लॅट नं. ए - ११ अवंती नगर भाग २, मनोरमा सुपर बाजार जवळ, जुन्या पुणे नाक्यापाशी, सोलापूर. ४१३ ००१.<br>फोन - (०२१७) २३२०९४६<br>मो - ९८९०५ १६०१० सोमवारी बंद | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. २५० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. |
| २३. | **नागपूर**<br>महाशिव वाक्य तुल्य नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. आर. ईश्वरन. | ११०, टेलिकॉम नगर, प्रताप नगर, आरएसएस ग्राऊंडसमोर, नागपूर. ४४१०२२<br>फोन - (०७१२) ६५७६०२२<br>मो - ९२२६७६०२२३/९४२१७०५०३० | फी - रु. ३०० जनरल कांडम रु. २५० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. |
| २४. | **नागपूर**<br>महाशिव सूक्ष्म नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. पुरुषोत्तमन | फ्लॅट नं. ३०३, जे पी हाऊस, रविनगर चौक, रविनगर, अमरावती रोड. नागपूर<br>फोन - (०७१२) ६५७६०२२<br>मो - ९२२६७६०२२३, ९४२१७ ०५९३० | फी - रु. ३५१ जनरल कांडम रु. २५० अन्य कांडांसाठी. हिंदीतून भाषांतराची सोय आहे. |
| २५. | अगस्त्य महाशिव वाक्य तुल्य नाडी केंद्र - नाडीशास्त्री -श्री. सुंदरम | १६१, कमलहाऊस स्वामी कॉलनी, फ्रेंडसकॉलनी जवळ काटोळ रोड, नागपूर ४४४ ०१३.<br>फोन - (०७१२) २५७४२००<br>मो - ९८६००८९४७१ | फी - रु. ५०० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. गुरुवारी बंद |
| २६. | **कोल्हापूर विभाग**<br>अगस्त महाशिव तुल्य नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. एन. जयसूर्या | श्री अपार्टमेंट्स फ्लॅट नं. ३, सी केज एक्सटेन्शन, कोल्हापूर ४१६ ००१<br>फोन - (०२३१) २५२०३१५.<br>मो - ९३७१०९४२१४ | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठी हिंदीतून भाषांतराची सोय आहे. |

| क्र. | नाडी शास्त्रींचे नाव व नाडीग्रंथ | पत्ता व फोन नंबर | फी व इतर माहिती |
|---|---|---|---|
| २७. | **बृहन महाराष्ट्र विभाग-(बडोदा).** | | |
| | अगस्त्य नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. एन. आर. रामन. | फ्लॅट नं. १०५/बी, हेमदीप टॉवर्स, बेहाना, फत्तेगंज, बडोदरा फोन - (०२६५) २८२७३४ मो. ९८९८२ ०३१८ | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. २५० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. |
| २८. | **बडोदरा विभाग** | | |
| | अगस्त्य महाशिव नाडी केंद्र- नाडी शास्त्री - कौशिकन | ३० - बी, गोवर्धन पार्क - १, कीया मोटर्सच्या मागे, छानी जकात नाका, बडोदरा, ३९०००२ फोन - (०२६५) ६५०८४३९ मो. ०९८२५० ०८४५५ | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. गुजराथी, मराठी, हिंदीतून भाषांतराची सोय आहे. निलेशभाई त्रिवेदी यांच्या मार्गदर्शनाखाली. मो. ०९८२५०४४७९८ |
| २९. | **अकोला विभाग** | | |
| | अगस्त्य महाशिव नाडी केंद्र - नाडी शास्त्री - बालास्वामी | चिकटे बंगला तुकाराम हॉस्पिटल समोर, गोरक्षण रोड, अकोला फोन - (०७२४) ६५५५५२४ मो. ९८९०८५१८३८. | फी - रु. ५०० जनरल कांडम रु. ३०० अन्यकांडांसाठी गुरुवारी बंद. |
| ३०. | **इंदूर** | | |
| | अगस्त्य नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. गणेशस्वामी | फ्लॅट नं. १०२, वितिन कांती मेन्शन, पहिला मजला, अनूपनगर, इंदूर १८ फोन - (०७३१) ५०६२४२६. मो. ९८९८२ ०३१८ | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. २५० अन्य कांडांसाठी. मराठी हिंदीतून भाषांतराची सोय आहे. |
| ३२. | **दिल्ली.** | | |
| | अगस्त्य नाडी केंद्र - नाडी शास्त्री - श्री. बी. राजू. | ई-१,/२०९, दुसरा मजला, कृष्णा मार्केट जवळ, लाजपतनगर-१, नवी दिल्ली-२४ फोन - (०११) २६८४८२८० | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. २५० अन्य कांडांसाठी. गुजराथी, मराठी हिंदीतून भाषांतराची सोय नाही. |

| क्र. | नाडी शास्त्रींचे नाव व नाडीग्रंथ | पत्ता व फोन नंबर | फी व इतर माहिती |
|---|---|---|---|
| ३३. | **वसई विभाग**<br>अगस्त्य महाशिव नाडी केंद्र -<br>नाडी शास्त्री -<br>श्री. गोविंदराज | सुभाषिनी बिल्डींग, ए विंग, फ्लॅट नं. १/२, तळमजला, बाभोला, 'सँटार'च्या समोर पापडी रोड, वसई (पश्चिम) ४०१२०२<br>मो. - ९८२२१८३२९३.<br>सोमवारी बंद | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. २५० अन्य कांडांसाठी. मराठीतून भाषांतराची सोय नाही. |
| ३४. | **सिकंदराबाद.**<br>अगस्त्य नाडी केंद्र -<br>नाडी शास्त्री -<br>श्री. त्यागराजन | प्लॉट नं. १, घर नं. २२, साई नगर कॉलनी, वेलिंग्टन रोड, पिकेट सिकंदराबाद. ९. | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठी हिंदीतून भाषांतराची सोय आहे. |
| ३५. | **बंगलोर.**<br>अगस्त्य नाडी केंद्र -<br>नाडी शास्त्री -<br>श्री. एस. मणिवासकन. | फ्लॅट नं. ९, तिसरा क्रॉस, भवानीनगर, अरुणोदय कल्याण मंडपमच्या समोर, बानेर घट्टा रोड, बंगलोर. ५६० ०२९<br>फोन - (०८०) २६६८ ९१६९. | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. २५० अन्यकांडांसाठी मराठीतून भाषांतराची सोय नाही. |
| ३६. | **गोवा विभाग**<br>अगस्त्य नाडी केंद्र -<br>नाडी शास्त्री -<br>श्री. मारी मृत्थु | ७-१, धुलेर म्हापसा, गोवा.<br>फोन - | फी - रु. ३५० जनरल कांडम रु. ३०० अन्य कांडांसाठी. मराठी हिंदीतून भाषांतराची सोय आहे. |


मंगळ मंदिरस्थान वैदीश्वरन कोईल




शनि मंदिरस्थान तिरूनल्लार


राहू मंदिरस्थान तिरूनागेश्वरन




केतू मंदिरस्थान किळ पेरूम पल्लम

## नाडी ग्रंथ ज्योतिष अधिवेशन पुणे दिनांक : १४ ऑक्टोबर २००७



रोजी 'विज्ञान आणि चमत्कार' ग्रंथाचे उद्घाटन करताना शशिकांत ओकांसमावेत डावीकडून सुभाष हावरे, अद्वयानंद गळतगे, चंद्रकांत शेवाळे, फिरोज मिस्त्री, विंग कमांडर राकेश नंदा, अशोक लचके, व सौ. अलका ओक.



# नाडी ग्रंथ भविष्य

नाडी ग्रंथ शास्त्र हा भारतीय संस्कृतीचा व साहित्याचा ठेवा आहे. अनेक महर्षींनी हजारो वर्षांपूर्वी, लाखो-करोडो लोकांसाठी, तमिळ व इतर भाषांमध्ये लिहिलेल्या नाडी भविष्य ग्रंथांची ओळख हवाई दलातील कार्यरत विंग कमांडर शशिकांत ओक यांनी 'नाडी ग्रंथ भविष्य - चक्रावून टाकणारा चमत्कार' या पुस्तकात केली आहे.

भविष्य हा विषयच मोठा रंजक. प्रत्येकाला 'पुढे काय होणार' हे जाणण्याची प्रचंड उत्सुकता. नुसत्या अंगठ्याच्या ठशावरून आई-वडिलांचे, पती/पत्नीचे, स्वत: तुमचे नाव, जन्म-तिथी, वार, महिना, संवत्सर प्राचीन ताडपत्रावर कोरलेले तुम्ही तुमच्या डोळ्यांनी पाहू शकलात, पुढील भविष्य जाणू शकलात, तर चमत्कार नव्हे काय?

'नाडी ग्रंथ भविष्य' या पुस्तकात विंग कमांडर शशिकांत ओक यांनी जिज्ञासू वृत्तीने नाडी ग्रंथांचे अवलोकन करून आपल्याला व इतरांना आलेले अनुभव सादर केलेले आहेत. या शिवाय नवग्रहमंदिराबाबत उत्सुकता असणाऱ्यांसाठी आवश्यक माहिती प्रथमच या पुस्तकात देण्यात येत आहे.

## हा घ्या चमत्काराचा पुरावा !




दोन वेगवेगळ्या नाडीपट्ट्यांत दिसणारा 'शशिकांत' शब्द

## नाडी ग्रंथ ज्योतिष अधिवेशन
### पुणे



काळाचा ओघ ही एक प्रचंड नदी
ज्याचे तीर कोणी पाहिले? व्यक्तीचे
जीवन ही एक नाव. या नावेची दोन वल्ही.
एक वल्हे ज्ञानाचे - बुध्दी, तर्काचे. दुसरे वल्हे.
कर्म - प्रयत्नाचे. या नावेला शिडाच्या खांबाचा
आधार श्रध्देचा, दुर्दम्य आशावादाचा.
शिडाच्या झेंड्याला परमशिव तत्वाचे
चिन्ह. शिडाच्या कापडावर,
पट्ट्यांवर नाडीमहर्षींनी लिहलेले
भविष्यग्रंथ.

गौरव चिन्ह

दि. १४ ऑक्टोबर २००७